1720 (1798 A. D.). They also issued a communique on the restoration of the King.

Sherfoji lost no time in restoring good government and in redressing the grievances of his subjects. He infused a new spirit in the atmosphere about him and effected improvements in all directions which brought great relief to his subjects.

Shortly after, he also helped the British in their war against Tippu Sultan by despatching to their aid some of the best units of his cavalry. Yamuna Bai and Ahalya Bai Sahiba, belonging to the Gadge family, became his queens now.

A question arose at this time about the financial dealings of the former Resident Macleod with Sherfoji. Sherfoji, in a letter dated 27—5—1800 to Resident Durien, set out the true facts and Macleod was found to be in the wrong. The company officials accepted the words of Sherfoji and took action against Macleod. The latter appealed to Sherfoji for mercy and he not only excused him but also recommended the payment to him of a sum of Rs. 10,000 to show his pity for one in distress.

Queen Ahalya Boi, the second queen of the King, gave birth to a daughter called Sulakshana Boi Saheb.

The English now desired that as the evils of Amar Singh's reign were still oppressing the people, the Kingdom should be left in their hands. Sherfoji

agreed and signed a treaty with the British resigning the country to them.

In 1801 Sherfoji sent his force to help the British in their expedition against the Paliagar of Madura.

Before he was married, the Maharaja had been intimate with a very virtuous lady (Mukthambal). She bore him two children but both died. On her death bed she wished the King to conduct a choultry in her name. So, Sherfoji commemorated her by constructing on the way to Sethu (Rameswaram) a choultry, a temple, a garden and a tank and also founded an Agraharam (a colony of Brahmins) near by and called the whole place Mukthambalpuram. He also endowed amply for conducting charities here.

The King went on pilgrimage on three or four occasions. He toured the whole of the Chola country; he went to Srirangam. He travelled to the Ganges; he went to Palani. He was hailed with great honour wherever he went. One of the clauses of the treaty was that Sherfoji should be honoured wherever he went in the British territory. This was adhered to by the British during these trips.

The Resident Blackburn was greatly attached to Sherfoji and when he returned to England, he sent his valuable books, maps and the like in which Sherfoji was greatly interested.

Queen Ahalya gave birth to another daughter on the eve of his pilgrimage to Palani. This daughter was called Rajakumari Boi Sahiba. The Queen gave birth to a third daughter later, called Byaba Boi Sahiba.

A new bird called Baj entered Tanjore at this time.

Now, the King is leading a virtuous life and spends his time in sacred studies. He has no hatred for any country or people. He is indifferent to none, he is tolerant of all castes and creeds and is doing his best to see that every one lives in peace and happiness.

Born of the Bhonsle family, founders of the Maratta Kingdom, scatterers of their enemy, enemies of the Delhi overlordship, gems among Kings, rulers of the Maharashtra domain in the Chola country, the history of the Maratta Kings is calculated to do good to one and all.

Completed this 13th Day of December 1803 (Salivahana Saka 1759) by Bapu Rao, sculptor and devoted servant of the King and son of Vittal Rao and grandson of Bhavaganesa Rao, belonging to the Maharashtra caste.

॥ श्रीः ॥

श्रीजगदंबा प्रसन्न

# ॥ प्रस्तावना ॥

---

फार प्राचीनकालापासून राजघराण्याविषयीं व त्या कालच्या नैतीक धार्मीक कौटुंबिक स्थिती विषयीं सुद्धा इतिहास रचून ठेवणेची अमच्या पूर्वजांचि चाल होती. याचीं साक्ष रामायण महाभारतादि ग्रंथ पटवीत आहे. मधून कांहीं काल पर्यंत अनेक भानगडीच्या संसारक्रमानें ह्मणा अगर परकीय राजसत्तेनें आलेल्या अवनतीने ह्मणा इतिहास लेखनाची चाल बंद पडली होती. परंतु जेव्हां मराठ्यांनीं स्वधर्म व स्वराध्य ह्यांची स्थापना केली तेव्हां फार प्राचीनकालीन इतिहास लेखनपद्धतीपेक्षां त्यांच्या दृष्टी समोर असलेल्या मुसलमानी गद्यात्मक इतिहास लेखनपद्धतीचा स्वीकार करून जे कित्येक ऐतिहासिक लेख लिहिले त्यांतील तंजावर येथील श्री बृहदीश्वराचे देवालयांतील प्राकाराचे भिंतीवर खोंदिलेला तंजावर राजघराण्याचा इतिहास हा शिलालेख एक आहे.

ह्यांत श्रीनारायणापासून सूर्यनारायण मनु इक्ष्वाकु इत्यादि पौराणिक सूर्यवंशीय परंपरेची संज्ञा सांगून पुढें महाराष्ट्राचे धर्माभिमानी व राज्य संस्थापक श्री शिवाजी महाराजांच्या अगोदरील चौदा पिढ्या बद्दल माहिती दिली अहे. ह्यांतून कांहीं पिढ्याविषयीं फक्त दैविक साक्षात्कार सांगून पुढें कांहीं पिढ्यांचि त्रोटक माहिती दिली आहे. शिवाजी महाराजांचे अजे मालोजी यांच्या कारकिर्दिपासून विशेष माहितो व त्या त्या गोष्टी घडलेल्या कालाचे शक व संवत्सर दिले आहेत. आणि त्या पुढें तंजावर राजवंशीय शेवटील राजे श्री शिवाजी महाराज यांचे वडील श्री शरफोजी

महाराज यांच्या कारकिर्दींत त्यांच्या चिटणीसानी लिहिला आहे. ह्यावरून हा इतिहास अव्वल इंग्रजींतच लिहिला आहे. लेखाचे शेवटी "आतां शरफोजी महाराज सर्वदा शिवपुराण ऐकणें व शिवपूजा करून यावदिकही करीत सन्मार्गांतच आहेत. सकल जनासहीं सकल राज्यासहीं वैषम्य तिरस्कार या दोहींचा परित्याग करून त्या त्या मताचे मताप्रमाणें वेदाप्रमाणें चालवीत व सकल जनांसही व्यसन न येतां युक्तप्रकारें प्रतिपालन करिताहेत. श्री मद्भोंसल वंशांत महादंपतीश्रेष्ठ श्री मच्छंकरप्रसादजनित प्रतापस्वीकृत दिल्लि चातुर्भाग स्वातंत्र्य विपक्षीकृत दिल्लि राजसार्वभौम अवनीशकुललङ्गायमान महाराष्ट्र तथा चोळदेशाधिपती पुण्यश्लोक राजांचें चरित्र सकल मनोभीष्ट दायक ऐसें प्रथमवर्ण (ब्राह्मण) महाराष्ट्र जाति भगवंतरायाचे पौत्र विठ्ठलरायांचें पुत्र प्रस्तुत चोळेदशाधिपती श्रीमंत राजेश्री महाराज छत्रपती शरफोजी महाराजेसाहेब यांचें निज सेवक आश्वलायन सूत्र ऋक् शाखाध्यायी यांकडून लिहिलेजे ते शालीवाहनशके १७२५ रुधिरोद्गारी सवत्सर मार्गशीर्ष वद्य अमावास्या भौमवारी इंग्रेजी सन् १८०३ इसवी डिसेंबर १३ लेखन सीमा समाप्त".

हा लेख श्री शरफोजी महाराज यांच्या हयातींत लिहिला गेला आहे. इतकेच.नव्हे तर खुद्द लेखक महाराजांच्या चिटणीसीवर असल्या मुळें त्यांच्या आज्ञेनेंच लिहिला असण्याचा संभव आहे. तसें नसलेतरी त्यांचे अनुमत तरी खचित मिळाले असावें.

भाषे संबधि ह्मणजे जुन्या (ह्मणजे इतिहासाच्या साधनांत प्रसिद्ध होणाऱ्या) मराट्यांच्या दफ्तरापेक्षांहीं ही भाषा कमी सुधारलेली दिसते. श्री शिवाजी महाराजांचें मित्र नेटाजी पालकर यांचे नांव ह्या लेखकानें नेतोजी असें दिलें आहे. एकंदरींत शब्दाचे अपभ्रंश वगैरे असून भाषेच्या शुद्धपणा विषयीं अधीक दृष्टी दिलेली दिसत नांहीं.

बाकी कालविषयींची माहिती वगैरे गोष्टी बिनचूक असतील किंवा कांहीं कमी अधीक असेल याचा निर्णय करणेचें काम महाराष्ट्र इतिहासाचे अभिमानी व त्यावर सतत अविश्रांत परिश्रम करणाया रा. पारसनीस रा. राजवाडे वगैरे इतिहासाभिज्ञाचें आहे. त्यांत आह्मी कांहीं ठरविणें योग्य होणार नाहीं.

हल्ली अमच्या पूर्वजांचा इतिहास जाणण्याची इच्छा बरीच ऊत्पन्न झाली आहे. त्यासाठीं इतिहास रचनेस पूर्वांग अशी इतिहासांची साधनें जमविण्याची चोहोंकडे खटपट चालली आहे. त्यांत हया लेखाचा बराच चांगला उपयोग होईल.

आतां प्रस्तुत लेखाची भाषा जरी शुद्धनाहीं तरीं छत्रपती श्री शिवाजी महाराजाच्या पूर्विं बयाच पिढ्या त्यांचे पूर्वज बादशहाचे सरदार या नात्यानें उच्च दर्ज्यास पावले होते. व त्यांनीं युद्ध तह राज्यव्यवहार इत्यादि विषयांत चांगले प्रावीण्य संपादिलें होतें. श्री शिवाजी महाराजानी, पूर्वजांनीं पायाशुद्ध ठेविलेल्या सरदारकीवर स्वराज्य रुपि कळस चढविला. हे खरें असलें तरीं त्यांच्या पूर्वजांनीं हीं नावांचें बादशाही आधिपत्य मानून स्वराज्यच स्थापिलें होतें. नावाची बादशाही सत्ता टाकून अगदी स्वतंत्र स्वराज्य महाराजानीं स्थापिले. श्री शिवाजी महाराजांची हिंमत बुद्धिचातुर्य धैर्य शौर्य ईश्वरनिष्टा व कर्तबगारी हे सर्व अलौकिक होतें. हे अगदी यथार्थ आहे. आणि ह्या गुणाशिवाय स्वतंत्र राज्य स्थापना करितां आली नसती तरीं पण पूर्वजांनीं जी योग्यता संपादिली होती ती नसती तर त्यांच्या हातून हे काम कसें तडीस गेलें असेल हे आतां सांगतां येणेंजोगें नाहीं. पण एवढें मात्र खरें किं तेव्हां महाराष्ट्राचे इतिहासास निराळेच स्वरूप आले असतें.

तंजावर,<br>
२७—१—१९०७.

तं. सांबमूर्तिराव.

॥ श्री ॥

## तंजापुरीं श्रीबृहदीश्वरालयस्थ शिलालिखित

## भोंसलवंशचरित्र.

श्रीमद्भोंसल वंशाचा आदि मूलपुरुष श्रीमन्नारायण त्यापरंपरेने श्रीसूर्यनारायण त्यापासून मनू मनूपासून राजा इक्ष्वाकु त्याराजाचे परंपरेंत कृत त्रेता द्वापर या तीन युगांतहीं प्रख्यात पुण्यश्लोकराजे जाहले. या वंशांत प्रस्तुत कलियुगामध्ये शंभुपर्वतप्रदेशीं महाराष्ट्र देशाधिपति शौर्योदार्यगुणप्रख्यात राजा शंभू ह्मणून अवतरला. त्याराजानें आपुल्या स्वधर्मयुक्त विहितमार्गानें राज्य परिपालन करी. त्यासरिसें शंभूपर्वतावरी श्रीसांबशिवप्रसादार्थ अनुष्टानहीं करीत आला. त्या अनुष्टानास संतोष पावून श्रीसांबशिवानी त्या शंभूराजास स्वप्नांत प्रत्यक्षहोऊन तुला संतती संपत्ती विशेषेंकडून होईल ह्मणून प्रसाद वाक्याचे अभय दिल्हे. सवेंच कित्येक दिवसाने त्या-शंभुराजाचे जठरसमुद्रीं गुणरत्न यशप्रथम येकोजीराजे संभवले ॥ १ ॥ त्या येकोजीराजानी त्या शंभुपर्वतप्रदेशीं विहितरीतीने राज्यभार करीत असतां त्या सांबशिवानुग्रहें कडून येकोजीराजाचे उदरीं शरभराजे नामक प्रथम सत्पुत्राचा संभव झाला. ॥ २ ॥ ते शरभराज सार्वकालाहीं विभूतिरुद्राक्षालंकृत कडून श्रीसोमस्कंदमूर्तिची उपा-सनायुक्त राज्यपरिपालनकरीत असतां तेच सोमस्कंदमूर्ति स्वप्नांत प्रसन्न होऊन मन्त्रोपदेश केले. त्या मंत्राचे माहात्म्येकडून दक्षण प्रांताचे पादशाहा संतोष पावून बिर्दलीपुरास प्रति नाम विदलरही शरभराजास जाहागीर दिल्हे ऊपरी शरभराजाचे उदरी महासेन ह्मणून

राजे जन्मले. ॥ ३ ॥ त्या महाशेनराजानी पन्नासहजार स्वार स्तोमचेऊ नहंबीरपादशाहस युद्धास कुमुक केले. तदनंतरें त्यामहाशेनराजानी परम नीतीकडून राज्यपरिपालन करीत आल्या पुण्य प्रभावेंकडून त्यांस पन्नास पुत्र झाले. त्या पन्नास पुत्रांपैकी ज्येष्टपुत्र येकशिवराजा ह्मणणार राज्यधर वंशधरहीं झाले. त्या येकशिवराजानी श्रीसांबशिवाची भक्ती विशेष केल्यामुळें सांबशिव प्रत्यक्षहोऊन या उपरी तुह्मास व तुमचे वंशपरंपरेसहीं माहाराज ह्मणून सकल प्रपंचांतहीं प्रख्यात होईल ह्मणून तेंव्हाच माहाराज बिरुदें समग्र वागवणेस तुह्मी योग्य करितां उत्तम बिरुदें समग्र वागवणें ह्मणून आज्ञापिले. त्या श्रीसांबशिवाचे आज्ञेवरून माहाराज येकशिवराजानी स्वतेव इतर राजास जिंतून संपादिली बिरुदें कित्येक व हंबीर पादशाहानी येकशिवराजाचे वडील महाशेन राजानी आपल्यास फार कामा आलेते नव्हतां येकशिवराजेहीं प्रख्यात होऊन बहुत शूरत्वेंकडून आपल्यासहीं फार वेळ कुमुक करून स्थापिले. सांप्रत त्यांस श्रीसांबशिवप्रत्यक्ष होऊन सकल बिरुदें वागवणेस आज्ञापिले करितां आपणहीं या येकशिवराजास आपली खांस बिरुदें कित्तेक द्यावी ह्मणून हत्तींची बिरुदें कित्येक व घोडयाची कित्येक इतर बिरुदें कित्तेक येणे प्रमाणें दिले. तेंव्हां त्या येकशिवमहाराजानी ते बिरुदें समग्र येकवटून अपल्या जवळील उत्तम सामादिक सर्वदां उत्तम काम करीत आले. त्यांस येकेक काम नेमिले त्याचा विस्तार थोडा जाणवितों. जे मुख्यप्रधान पेशवे व फौजदार सरनोबत देवकराचे घराणे व दुसरे फौजदार पोंवारांचे घराणे. त्या त्रिवर्गासही नेमिलि कामें आपल्या घोडयास व हत्तीस बिरुदें बांधितांनां इतर सामादिक व वरी लिहिलें त्रिवर्ग मुख्यसामादिकांनीहीं बसून बिरुदें उचलून पोंवारानीं पेशव्याचे हातीं देणे. त्यानी देवकराकडे देणें देवकरानी बांधणे व कित्तेक बांधवणेंहिं

येणेप्रमाणे चालविले. त्याचरीती तेते वंशस्थ अद्यापि तेचकाम करीत येतात. याखेरीज दुसरी यांस हत्यार धुणे देवकरानींच धुतली. त्यांसहत्यारें देवकरानीच आणून माहाराजापासी देणें तदनंतर ते हत्यार पूजितेवेळेस उजव्या बाजूस पोंवार डाव्या बाजूस देवकर मध्ये महाराज पेशव्यासहीं घेऊन बसून पूजाकरिणे. महाराज सिंव्हासनांवरी सदरेस बसल्यावेळेसहीं उजवीबाजू डाव्याबाजूस वरि लिहिल्याप्रमाणे पोंवार देवकर पेशवे पुढेंबसणें. येणप्रमाणें आज्ञापून उरली बिरुदें व हत्तीवरील नौबतपंजा हत्तीवरील माही मरतब व हत्तीवरील तासबिरुदाचे भालबची निशाने वगैरे इत्यादिबिरुदें जिलेंबेस व माघिलांगी यावयाच्या यथाक्रमेकडून चालवीत आले. तदनंतरें प्रकृत आपलेचित्तानुरूप कित्तेक बिरुदें अंगीकारिले. त्यांत या महाराष्ट्र देशास व त्याजातीसहीं मुख्ययान पालखी जाहल्याकरितां त्या पालखीसच लाविलीबिरुदें लिहितों. पालखीची तवकडा व कमान देखील हत्तीचे दांताची शिफेद येकरंग त्यास रेशमी काऱ्हण्या व नवार रेशमी दांडीचे पुढिले बाजूस सिंव्हललाट सोन्याचे दांडीचे माघले बाजूस शार्दुलवदन सोन्याचे पिंजरीचे शेवटासदोनीबाजूस जडित केळीचे फुलाकृती कलश २. पिंजरीचे चारीकोनेस जडीत गोंडे जरीझालरी ४. दोनीबाजूचे कत्तरीवरील दांडीस रुप्याचे खुब्याचे जरी गोंड्याचे घोंस. दांडीस समग्र जडित खुब्याचे येखादे सोन्याचें खुब्याचेंहीं भरजरी गोंडे. पालखींतसमोर अरसा, वठहिं, पालखी यांत दांडीस मोराचा विजणा, रुप्पेरी पिंजरा वरी शिफेद फूल, बासण, दांडीचे पूढिले बाजूस सिंव्हललाटा, वरी फुलाचाहार, धरितागोंडा, जडितखुबा, येखादे सोन्याचाखुबा. भरजरी दांडीस दोनीबाजूस मखमली गलेफ. येणप्रमाण यायेकशिव

महाराजानी बिरुदाचे पालखींत स्वारकरूंलागले. याखेरीज हत्ती घोडयाची वगैरे बिरूदें प्रसंगानुसार लिहिली आहेत. तदनंतरे त्या येकशिवराज्याचे उदरीं रामचंद्रराजे जन्मले. ॥ ४ ॥ त्या रामचंद्रराजानी न्यायेकडून राज्यपरिपालन करीत असतां त्यां चे उदरी भीमराज ह्मणून राजे जन्मले. ॥ ५ ॥ त्या भीम-राजानी विहितधर्मेकडून प्रजापालन करीत असतां त्याचे उदरीं दुसरे येकोजीराजे जन्मले. ॥ ६ ॥ त्या येकोजीराजानी आपले स्वबाहुबलपराक्रमे कडून सातारगड आक्रमिले. तदनंतरे पादशा-हासी युद्ध प्रसक्तिपडल्यामुळे गडावरीच वासकरून होते. उपरी त्या येकोजीराजाचे उदरी वराहराजे जन्मले. ॥ ७ ॥ ते वराहराजे परमशूर न्यायेकडून राज्य परिपालन करीत येण्यांत पंचावन्नहजार स्वारठेऊन पादशाहाशीं युद्धकरून जिंतून ख्याती केले. उपरी त्यांचे उदरी तिसरे येकोजीराजे जन्मले. ॥ ८ ॥ त्या येकोजीराजाचे उदरी ब्रह्माजीराज जन्मले. ॥ ९ ॥ त्या ब्रह्माजीराजाची धर्म पत्नी अनसाउ त्यां उभयां पासून प्रथम शाहजीराजे जन्मले. ॥ १० ॥ त्या शाहजी राजाची पट्टस्त्री उमाउ त्या उभयां पासून अंबाजीराजे जन्मले. ॥ ११ ॥ त्या अंबाजीराजाची स्त्री रेणुकाआउ त्या उभयां पा सून परसोजीराजे जन्मपावले. ॥ १२ ॥ त्या परसोजी राजाची स्त्री उमाउ त्या उभयां पासून बावाजीराजे जन्मपावले. ॥ १३ ॥ त्या बावाजीराजाची स्त्री रेखाउ. त्यां उभयां पासून दोघेपुत्र जन्मले. त्या पैकीं ज्येष्ट मालोजीराजे दुसरे विठोजीराजे. ॥ १४ ॥ दुसरे पुत्र विठोजीराजाची धर्मपत्नी आउ वाई साहेब त्यां पासून ज्येष्टकन्या अंबाबाई त्या उपरी अष्टपुत्र जन्मपावले पैकीं पहिले संभाजीराजे दुसरे खेलोजीराजे तिसरे मालोजीराजे चौथे परसोजीराजे पांचवे नागोजीराजे साहवे मनोजीराजे सातवे कंकाजीराजे आठवे

त्रिंबकजीराजे हा बावाजीराजे यांचे दुसरेपुत्र विठोजीराजाचा वंश. याउपरी यांचा विस्तार पुढें येयील. आतां बावाजीराजे यांचे ज्येष्टपुत्र मालोजीराजे यांची ख्याती त्यामालोजीराजे यांनी उमाबाईसाहेब यांसी पाणिग्रहण करून घेऊन विहित धर्म करून स्वराज्य परिपालन करीत येते त्यासमयीं निजाम पादशाहा ह्मणणार देवगिरी दुर्गांत राज्यकरीत होता. व इब्रहीम पादशाहाचा लेंक यदलूशाहा ह्मणणार पादशाहा विजय दुर्गांत राज्यकरीत होता. त्या यदलूशाहास प्रतिनाम अल्लीशाहा ह्मणूनहीं प्रख्यात होतें. अवशात् देवगिरी दुर्गाच्या निजाम शाहासहीं व विजयदुर्गाचाराजा यदिलूशाहासहीं युद्धप्रसंग पडलें. त्याप्रसक्तींत बावाजीराजाचे पुत्र मालोजीराजे परमशूर बहुत युध्दांत जय पावले आहेत हे जाणून मालोजीराजास वयांचे भाउ विठोजीराजासहीं देवगिरीदुर्गाचा निजाम पादशहा सहायास बलाविला. त्या उभयता बंधूनी सैन्यासह निजामशहाला सहायहोऊन विजयदुर्गाचा राजा अल्लीशहाबरोबर युद्धकरून जयपावून निजामपादशहाची संकटे परिहारकरून त्याचे देवगिरीदुर्गाचे राज्य त्यास देतेझाले. तो संतोष पावून आपुल्या समग्र राज्यांतहीं चौथायी जहागीर देऊन मालोजीराजे बिठोजीराजे उभयतां बंधूनीं आपल्याकडेंच असावे ह्मणून प्रार्थिले. तेणेप्रमाणेंच मालोजीराजानी आपुले स्वराज्य आपले सचिवाचे स्वाधीन करून आपण उभयतां बंधूनी निजामशाहाकडेंच वास्तव्यकेले. तेव्हां मालोजीराजास शाहाशरीफ बेअल्ली कलंदर ह्मणणार एक फकीर सिद्धपुरुष स्नेहित जाहला. त्या शाहशरीफ ह्मणणार फकीराचे ठांयांस मालोजीराजानी जाऊन आपल्यास पुत्रसंतान नाहीं ह्मणून सांगीतले. त्यास त्या फकीरानी कांहीं वेळ ध्यानकरून सेवेंच मालोजी-राजास पाहून ह्मणाले. जे तुह्मास दोघेपुत्र होतावी दोघे महाशूर परम भाग्य-वंतही होतील त्यांचावंशहीं विस्तारकहून होईल. त्यांचे वंशी परंपरेंत जाहले पुत्रसमग्रहीं परम भाग्यवंत होऊन असतील त्यादोघां पुत्रांसहीं अमचे नांवें ठेवा आणि आह्मीदेतों त्यावस्तूस मर्यादेंकहून ठेवा ह्मणून पांचवस्तू दिल्हे· त्याचा

तपशील नागीन ह्मणोन येक तरबार पन्नीन ह्मणोन येक तरवार येकून तरवारा दोनी व अपला लंगोटा एक व कलदरा एक व पंजा १ ऐशे पांच वस्तू दिल्हे उपरी मालोजीराजास प्रथम पुत्र शालीवाहनशके १५३१ साधारणसंवत्सरीं दुसरे शाहजीराजे जन्मले. तदनंतर दुसरे पुत्र जन्मले. त्यांस शरफोजीराजे ह्मणून नाम ठेविले ते दुसरे ॥ १५ ॥ तदनंतरें ज्येष्ठ पुत्र शाहजीराजे ५ वर्षाचे वयारूढ झाले तेव्हां कोल्हापुरचे राजे होते. त्यास व निजामशहा पादशहासहीं विकल्प पडून कोल्हापुराचा राजा व पांच वर्षाचे शाहजीराजाचे वडील मालोजीराजास युद्धास पाठविले. तेव्हां मालोजीराजे निजामशहाचे प्रेषित होऊन आपले स्वसैन्य व पादशाहाचे सैन्यहीं स्वारवार परिवार हत्यारासहीत कोल्हापुरच्या राजावरी जावून अद्भुत युद्ध करून बहुत वार शत्रूस पराजयहीं करून तदनंतरें सन्मुख युद्धांत वीरस्वर्गपावले. उपरी शाहजी राजास निजामशाहा पादशहानी या शाहजीराजे, शरफोजीराजे उभयतांचे वय लहान करितां त्यांचे संरक्षणास्तव त्यांचेचुलते विठोजीराजांकडें निरवून त्यांचे योग्यतानुसार परिपालन करविलें. तदनंतरें शाहजीराजे यौवनारूढ जहाल्यावरी मोहते रायांची कन्या उमा बाईसाहेबास प्रथम पाणिग्रहण केले. तदनंतरे निजामशाहाचे अनुमतीने शाहजीराजे आपले स्वराज्यपदास शालीवाहनशके १५४३ दुर्मतीसंवत्सरीं तक्त निशी जाहले. सवेंच यादवराजे ह्मणणार कोणी एक राजे होते. त्यानी प्रार्थनापूर्वक आपली कन्या जिजाऊस शाहजीराजास द्वितीय विवाहास लग्नकरूव दिल्हे. या शाहजिराजाचे धाकुटे भावू शरभोजीराजे यानी विश्वासरायांचीकन्या दुर्गाबाई यांसी लग्नकरून घेतले. तदनंतरें कितेकदिवसावरी याउभयताचे चुलते विठोजीराजे देतगतीस पावले. त्यांचे लेंक आटजणहीं निजामशाहा पादशहास अनसरून होते. तदनंतरें कांहीयेक विशेष दिवसांत निजामशहा पादशहानी आपल्या खालील राजेलोक तमामास बोलाऊन पाठवून सदर केले. त्या सदरेस आल्या उपयुक्त नावनिशा-प्रथम मालोजीराजेत्यांचेलेंक

शाहजीराजे शरफोजीराजे हे दोघेभाऊ व यांचे चुलतभाऊ विठोजीराजे यांचे लेंक आठजण व शाहजीराजे यांचेदुसाया स्त्रीचे जनिता यादवराजे ह्मणणार येक व त्यांचे पुत्र दत्ताजीराजे ह्मणणारही व खंडागळे ह्मणणार तेहीं येक थोरसरदार समग्रहीं सदरमाडा जाहल्यावरी बाहेरी येतेवेळेस दाटणपडली त्या दाटगींत वरी लिहिल्या खंडागळे ह्मणणार सरदाराचा हत्ती मस्तीस येऊन बहुत प्रजांस मारिला. तेव्हां यादवराजे ह्मणणाराचे लेंक दत्ताजीराजे यानी तरवार घेऊन त्या खंडागळाच्या हत्तीस मारावेंयास गेले. त्या वेळेस विठोजी राजाचे लेंक आठजण भावांपैकीं संबाजीराजे ह्मणणार एक व खेळोजी ह्मणणार येक यादोघानीहीं खंडागळेच स्नेहास्तव त्या खंडागळाचा हत्ती मारावयास आल्या दत्ताजीराजास हत्ती मारणें गरजनाहीं ह्मणून अटकाविले. तेंव्हा दत्ताजीस रागयेऊन बहुत लोकांस जायां केला हत्तीस मारावें ह्मणालियास तुह्मी अटकावणें काय ह्मणून येकास येक चर्चावाढून हातासहात मिळून हानीं जंगी जाहली. त्यांत विठोजीराजाचे लेंक संभाजीराजाचा हात चालून दत्ताजीराजाचे डोसके उडालें. तेंव्हा त्या दत्ताजीराजाचे वडील यादवराजे पुढें लांबले होते. त्यास आपले पुत्र दत्ताजीराजे खंडागळेचे हतीस्तव विठोजी राजाचे लेंक संभाजीराजाकडून दैषगतीतें पावले ह्मणावयाचे वर्तमान कळून तसेंच यासंभाजीराजे खेळोजी-राजावरी युद्धास आले. तेंव्हा शाहजी राजानी यादवराजे आपले सासरे जाहलेतरींहीं आपले चुलतभावू संभाजीराजे व खेळोजीराजे यां उभयतांवरी युद्धास आलेकां ह्मणून त्यायुद्धास आपण पुढे होऊण युद्धकेले. तेंव्हां सासरा यादवरायाचा हात चालून शाहजीराजे मूर्छागत जाहले. तेंव्हां यादवराजानी आपले जांवाई शाहाजीराजे मूर्छागत जाहले त्यावरी हतकरीनासें त्यांच्या सैन्यावरी युद्धास प्रवर्तले. त्या युद्धांत विठोजीराजांचे लेंक संभाजीराजे यादवराजा कडून रणास आले. सवेंच शाहजीराजेहीं मूर्छेतून सावध होऊन युद्धास प्रवर्तते समयीं हे वर्तमान येकंदर निजामशाहा बादशाहास

कळून यादवराजास पुत्रशोक जाहल्या करितां पराक्रम असेल त्यासमयी युद्धकामानये ह्मणून राहतें करून त्यां त्यांस त्यां त्यांचे स्थलास निरोप दिल्हे. यादवराजे स्वस्थलास जावून विमनस्क होऊन होते. येणे प्रमाणे यादवराजे विमनस्क आहेत ह्मणायाचेहीं विमनस्क होण्यास कारणहीं विजयदुर्गाचे राज्यकरणार अल्लीयदल्शाहास कळून त्या अल्लीयदल्शाहानी योचना केलीजे. देवदुर्गाचे निजामशाहा पादशाहास आह्मास विरोध पडून येकदोनदा युद्धारंभ केल्यांत शेनेसहित आपण भग्न जाहले. त्यास कारण मुख्य शाहाजीराजे व यादवराजे प्रभृति शूर निजामशाहा पादशाहाकडे मिळून आहेत करितां त्या पैकी यादवराजा महाशूर तो प्रस्तुत विमनस्क जाहला आहे करितां त्याला संविधान करून आपलें करून घेऊन निजामशाहाशी युद्धास आरंभ करून जयप्रद व्हावे ह्मणून दृढ योचना करून यादव राजासी संविधान करून भेटी गोष्टी जाहल्यांत यादव राजानी सांगीतले जे केवळ तुमच्या अमच्या सैन्ये कडूनच निजामशाहा जिंतलाजाईना कां ह्मणिजे त्याकडे शाहजी राजे प्रभृति कित्येक प्रख्यात शूर आहेत त्यास्तव दिल्लेश्वर जाहगीर पादशाहासी संविधान करून त्याकडील सैन्य आणवून तदनंतरें निजामशाहासी युद्धास प्रवर्तावे ह्मणून सांगीतले. तेंव्हां अल्लीयदिल्शाहानी ह्मणाले जे तुह्मी सांगीतलेंते युक्तच आहे. तत्रापि अमचे वडील इब्राहीमखानास व जाहगीरपादशाहासहीं रिणानुबंध त्या अनुसंधाने कडून जाहगीर पादशाहाही अमुची गोष्टी अंगीकार करून आह्मास सहायहीं करितील ह्मणून तेणे प्रमाणे संविधानासही आरंभिले. तेव्हां जाहगीरपादशाहा दिल्लेश्वरयानी इब्रायीमखानाचे स्वस्नेहास्तव अल्लीयदल्शाहास कुमुक पाठविले ते तांब्रमुखी प्रजा सरदार लस्कीरखान् ह्मणणार तांब्रमुखी ह्मणिजे शुद्ध मोगलयांस कुमुक पाठविल्या कुमुक कडूनहीं व यादवराज आपल्या सरदारासमवेत मिळाल्याकरितांहीं त्यागेंकडून अल्लीयदल्शहानी निजामशाहासी युद्धकरावे ह्मणून त्यांच्या मुलुकातें उपद्रवास आरंभिले. तेव्हां निजामशाहा पादशहासी मिळून होते. ते सरदाराची

नावनिशी :- मालोजीराजाचे पुत्र शाहजीराजे, व शाहजीराजाचे भाऊ शरफोजी राजे, विठोजीराजे यांचे लेंक ज्येष्ट संभाजीराजे वीरस्वर्गस्तितजातां, वरकड नावनिशा खेलोजीराजे, व मालोजीराजे,संबाजीराजे, व नागोजीराजे, व परसोजीराजे, व मक्काजीराजे, त्र्यंबकजीराजे, शामवक्त्र सैन्याचे सरदार, शामवक्त्र ह्मणजे शुद्धहत्र, सीहमीरखान्, मुधाखान्, फलसखा देशाचा अधिपती बल्लाळराजा, बेडराचा यजमान सिंव्हराजा, विठोजीराजा ह्मणणार अन्य येक ह्मराटा, दत्ताजीराजा ह्मणणार अन्य येक ह्मराटा, नागोजीराजा ह्मणणार अन्य येक ह्मराटा, नरसिंव्हराजे ह्मणणार अन्य येक ह्मराटे, जगदेवराजाचे लेंक सुंदरराजे मराटे, तुरुष्कंदखनी सरदार सारतखान्, व याकूतखान् व पनसूरखान्,व सुरूपखान्, व जोहरखन, व फत्तेखान, व त्यांचेलेंक अहमदखान् प्रमुख देखिल, अकबराचे सेनापती निजामशाहा पादशहाचे या इतके सरदार मातबर राजेलोक देखील आपल्या सैन्या समवेत आपल्यासी मिळाले आहेत करितां, निजामशाहा पादशाहा अलीयदल्शाहास तृणप्राय मानीत होते. अलीयदल्शाहाने यादवराजाचे सैन्यासहित झाल्या कुमुकें व काहीं व दिल्लेश्वरानी मोगलाची कुमुकें पाठविल्याकडूनहीं निजामशाहासी युद्धास प्रवर्तलें करितां त्याकडील सरदारांची नावनिशा :- प्रथम यादवरायाकडील सरदार राजेलोक वगैरे ह्मराठे, तुरूक देखील नावनिशा जलाखान् व खजीरखान, व. खरमुल्लाखान्, सुजानखान्, व जाहनखान् , व शिकंदरखान्, व खलेलखान्, व हिसामदखान् , सदरल्हा तुरुक आठ जण यादवराजाचे लेंकाच्या नांवनिशा :- उदारराम, व विश्वनाथ, व अचल, व बाहदार, व दादाजी, व राघव, व जसवंत हे सातहीं यादवराजाचेलेंक. हे यादवराजाकडील सरदार समवेत यादवराजाहीं दिल्हेश्वरानी पाठविलया मोगलाचा सरदार लष्करखान, अलीयदल्शाहाकडील सरदार, ह्मराठे, तुरूक, वगैरे देखील मुस्तपखान, काहमदखान्, दिलावरखान् , याकूतखान्, अबरखान् , मुशेखान् , फरीदखान , सजीखान् , जोहरखान् , अंकुशखान् येकून दहा.

या खेरीज अलीयदलूशाहाचे वडील इब्राहीम् याचे आप्त साझिरे सरदार रूस्तुंखान् प्रभृति आणि धुंडीराव ब्राह्मण सरदार, मराठे सरदार, घांटके प्रभृति सेनापती मुल्लामअहंमदखान् या इतुकया सरदारांनिशी सेनापती मुल्लाम अहंमदखानास पुढें करून निजामशाहासी युद्धास प्रवर्तले. वरी लिहिल्या प्रमाणें निजामशाहानी आपले तरफेचे सैन्य व सरदार राजेलोक इत्यादिकांसीसह अंबरखान शेनापतीस पुढें करून अलीयदलूशाहासीं युद्धकेलें. त्या युद्धांत मालोजीराजाचे लेंक शाहजीराजानी रणशूर होऊन पूर्वी देवासुर युद्धापरी युद्धकरून दिल्हेश्वर जाहंगीर पादशाहानी अलीयदलूशहास कुमुकास पाठविल्या मोगलाच्या सैन्यास तमामास पराजय देऊन पळविले. त्या बरोबरी मिळून युद्धकेले, ते यादवराजाची फौजेसहीं पराजय देऊन पळविले. तसेंच, त्या शाहजीराजाचे भाऊ शरफोजीराजानी अलीयदिल्-शाहाचे फौजेशी निर्वाण युद्ध करून त्याफौजेसहीत सरदारासहीं पराजय देऊन अलीयदलूशाहाची फौज तमाम पळविली. पराजय पावून सैन्य समग्र अलीयदलूशाहा आदिकरून समग्रहीं कित्येक दूर पळून गेल्यावरी, त्या अलीयदलूशाहाकडील सरदारांपैकी जोहरखान ह्मणणार सरदारानें समग्रास इरेस घालून यादवराजे व मोगलाचे सरदार सर्वत्रांसहीं परतून घेऊन पुन्हा युद्धास आले. तेव्हां मालोजीराजाचे द्वितीय पुत्र शरफोजी-राजानी युद्धभार घेऊन शत्रु सैन्याभिमुख होऊन बहुत वेळ बहुता प्रकारें बहुत युद्धांची अंगेकरून बहुत सैन्य शत्रूचेरणास आणून आपणहीं वीरस्वर्ग पावले. सेवेंच त्यांचे वडील भाऊ शाहजीराजानी आपले चुलत भाऊ विठोजीराजाचे द्वितीय पुत्र खेळोजीराजास बरोबर घेऊन बहुत पराक्रमें करून युद्ध करून शत्रूस ताप देऊन परतून युद्धास आल्या जोहरखाना समवेत कितेक सरदारांसंही मारून कितेक सरदारांस जीत धरून काराग्रहीं प्रवेश करवून निर्वाण युद्ध केल्यांत अलीयदिल्शाहानी स्थिरून शाहजी राजासी युद्ध करवनासें आले. ते वपडाउ सांपळे सरदार जातां

उरलेते सरदार व यादवराजे प्रभृतेसहित छिन्ना भिन्न होऊन पळोन गेले. तदनंतरें शाहजीराजे रणस्वाधीन जाहल्यानंतरें अंबर शेनापतीस पुढें करून निजामशाहा पादशहापासी येऊन खुरनिशी केले. तेव्हां निजामशाहानी शाहजीराजास विशेष मर्यादा विशेष बहुमान विशेष आदरकेले. तदनंतरें विठोजीराजाचेलेंक खेळोजीराजानी शाहजीराजास झाला आदरमान आपल्या-सहीं व्हावा ह्मणायाची अपेक्षा धरून शेनापती अंबरखानास केवळ अनुसरले. तेव्हां त्या शेनापती अंबरखानाचे चित्तीं आपण सेनापती होऊन असूनहीं शाहजीराजानी युद्धांत जय संपादिल्या करितां पादशहाचे समक्षेमात आपल्या क्षेमास शंतगुणेंकडून अधीक मानाई झालेंकी ह्मणावयाचा मत्सर वाढत होता करीतां शाहजीराजाहून खेळोजीराजासी विशेष दिसून यावा ह्मणावयाचा दुरा-ग्रहेंकडून निजामशाहापासी खेळोजीराजाची योग्यता व शौर्य प्रस्तुत संभवल्या युद्धांत जय जाहला, तोहीं खेळोजीराजा मुळेंच ह्मणून असें येकंदर जाणवून निजामशाहाकैडून विठोजीराजाचे पुत्र खेळोजीराजास विशेष मर्यादा करविले. ते शाहजीराजानी ऐकून विमनस्क होऊन सर्वेच त्या संगतीचा त्याग करून आपले स्वस्थळ सातारगडास पावले. कितेक दिवसानंतर शाहजीराजे निजामशाहाकडून विमनस्क होऊन आपले स्वस्थलास पावला विध समग्र अलीयदुल्शाहास कळून, शाहाजीराजा सारिख्यास आपले करावे ह्मणावयाचे अपेक्षेने तदनुसार संविधानकेलें। त्या संविधानाची बोली प्रशस्त भासल्या करितां शाहजीराजानी अंगीकार करून अलीयदिल्शाहाकडे जाऊन भेटी व बोलणे झाल्यानंतर आपलें सैन्यव अलीयदिल्शाहाचे सैन्यहीं येकत्रहून येथून निजामशाहा वरी मोहिम् केले. तेव्हां पेसजी अली यदल्शाहासी दिलेश्वर जाहंगीर पादशाहानी मोगलाईचा कुमुक पाठविले होते, तेहीं व यादवराजेहीं या दोनी फौजाहीं अगावूच निजामशाहासी मिळून शाहजीराजानी युद्ध केल्यांत पराजय पावून फरारी जाहले, तेहीं व यादवराजे मोगलाचे इलाखेंत राहून गेले. प्रस्तुत शाहजीराजानी अली

यदलूशाहाचे सैन्य मात्र आपल्या सैन्याबरोबरी घेऊन निजामशाहावरी युद्धास जाऊन युद्ध केल्या ठायीं निजामशाहाचे सैन्य व सेनापती अंबरखान देखील पराजय पावून वाताहत झाले. शाहजीराजे जय पावून अल्लीयदिलूशाहाकडे आले. तेव्हां शाहा मजकूरानी फार संतोष पावून शाहजीराजास आपले अर्धराज्य जाहागीर दिल्हे. तदनंतरे शाहजीराजे अल्लीयदलूशाहाचे स्वाधीनेंत न्यायता होते. ते मुदेखान प्रभृतीस येकंदर जिंतून स्ववशास आणून पश्चिम प्रांत केरळदेश आदिकरून अनेक देशाचे देशाधिपती समग्र अल्लीयदलूशाहास तोफा देइजेसे करून अल्लीयदिलूशाहाच्या खजान्यास बहुतद्रव्य जमाहोइजेसेकेलें तदनंतरें शाहजीराजे विजयदुर्ग ह्मणावयाचे विजापुरांत असते दिवसांत च त्यांची दुसरीस्त्री जिजाईचे उदरीं शालीवाहन शकें १९४७ अक्षय संवत्सर प्रथम पुत्र संभाजीराजे जन्मले. त्यामागूनहीं क्रमेंकडून चौघे पुत्र जाहले. परंतु वर्धमान दशेस पावले नाहीत. ऐसें असतां देवदुर्गचे राज्यकरणार निजामशाहाचा सेनापति शाहजीराजासी मत्सर केला, तो अंबरखान देवगतीस पावला. येथें विजापुरांत अल्ली यदिलूशाहाचा बाप इब्राहीमखान तोहीं देवगतीस पावला. तेव्हां दिल्लेश्वर ऐसा जांहगीर पादशहानें पेसजी आपण दक्षिण प्रांतांत देवदुर्गाचा निजामशाहासहीं व विजापुरच्या अल्लीयदिलूशाहासहीं लढाईची प्रसक्ती पडलीहोती, तेव्हां अल्लीयदिलूशाहास कुमुक मोगलाईची फौज देऊन लष्करखानास पाठविला. तेव्हां निजामशाहानें शाहाजीराजाच्या बलेंकडून आमुचे मोगलाईच्या फौजेस मारून काहीं अपमान केला. आतां त्या निजामशाहाकडे शाहजीराजेहीं नाहीत व यादवराजाहीं अगोदरीच निघूनगेला. त्याचा सेनापती अंबरखान देवगतीस पावल्याकरितां त्यांचे बलहीं उणें पडलें. दुसरे त्या निजामशाहाची चर्याहीं नीटनाहीं. ऐशासमयांत त्याजवरि राजकारण केलीयां स्वाधीन होईल ह्मणून तजवीजकरून निजामशाहावरी युद्धास सैन्य देऊन दर्याखान ह्मणणार सरदारास पाठविले. हे वर्तमान निजामशाहास

करून निजामशाहानी आह्मांकडील शाहजीराजे व यादवराजे उभयतांहीं आह्मांकडून गेल्याकरितां ह्मणे पराजयहीं आला; आताहीं दर्याखानानें चाली केलीआहे, आतां सर्व प्रयत्न करून शाहजीराजे व यादवराजे उभयतांसहीं बलाऊन ध्यावे ह्मणून दृढ योचना करून उभयतांसहीं अंतरंगें करून संविधान पाठविले. त्यावरून यादवराजे मोगलाचे इलाखेंत होते तेहीं व शाहजीराजे विजापुरांत होते तेहीं उभयतां निजामशाहाचा मुलुक् देवगिरी समीप धारागिरी ह्मणावयांचे स्थलास येऊन पावले. त्या धारागिरी समीप शिवनेदीगड ह्मणून येकस्थल, त्या शिवनेदीगडचा यजमान विश्वासराव याचा वंशांत जन्मले ते विजयराजा ह्मणणार त्या शिवनेदीगडच्चे राज्य करीत होता. त्या विजयराजानी आपुली कन्या जयंतीबाई ह्मणणारीस शाहजीराजाचे ज्येष्ठ पुत्र संभाजी राजास देतों ह्मणून सांगून पाठविलें. तेव्हां शाहजीराजानी त्या मुलीस आपुले पुत्र संभाजी राजासहीं धटित पाहून, तदनंतरें विजापुरांतून आपल्या संसारासहीं वलावून पाठवून शिवनेदीगडास जावून संभाजीराजाची लग्न सिद्धीकेले. तेंव्हां निजामशहानी शाहजीराजास मोगलाची फौज घेऊन येणार दर्याखानावरी अपल्या स्तोम करून जा ह्मणून निरोपून यादवराजास आपल्या भेटीस या ह्मणून बोलावून पाठविले. तेव्हां शाहजीराजाची दुसरू स्त्री जीजाई बाईसाहेब पूर्ण गर्भ होते. त्यांस व कित्तेक सैन्यहीं त्यांचे संरक्षणास शिवनेदी गडांतच टेऊन वरकड सैन्यानिशी आपण दर्याखानाचे मोकाबिलेस गेले. गेल्यां ठांयीं दर्याखानासी युद्ध करून मोगलाची फौजा समवेत दर्याखानास पळवून जय पावून शाहजीराजे परतून शिवनेदी गडास येतोइतुकयांत जीजाईसाहेब यांस पूर्ण गर्भ होता, तो शालीवाहन शके १५५१ त्यास इंग्रजी वर्ष सन् १६२९ इसवी प्रमोदूत संवत्सरी प्रसव होऊन पुत्रोत्सव जाहला सर्वेंच शाहजी साहेब यांचे पोटी पुत्र संतान जाहले, त्या पुत्रास येकोजीराजे ह्मणून नाव ठेंविले. हे येकोजी राजे वंशांत चार येकाजीराजे

जन्मले. ते शालीवाहनशके १५५२ प्रजोत्पत्ती संवत्सर पेशजी शाहजी राजानी निजामशाहाचे सहायास्तव शिवनेदी गडांत आपला संसार ठेऊन मोगलाचा सरदार दर्याखानावरी जाऊन लढाई करून त्या दर्याखानास पळवून आले होते किं तो दर्याखान शाहजीराजाकडून पराजय पावून माघारला. तो पलीकडे न जातां तापी नदी तीरींच आपल्या फौजेनिशी राहिला होता. त्यातें(त्यानें) या निजामशाहाची अव्यवस्थ स्तिती व यादवराजे स्वर्गस्थ जाहले तो विध शाहजीराजे निश्चयेकडून विमनस्क होऊन स्व स्थलास जाऊन पावले ते ऐसें हे समग्र कळून घेतल्यावरी आतां निजामशाहाचे राज्य स्वाधीन करूये ह्मणावयाचे दृढ बुध्दीनें निजामशाहावरी चाली करून आला. त्यादिवसांत निजामशाहा देवगिरी दुर्गसोडून धारागिरी दुर्गांत होते. निजामशाहा कडील या रीतीचे वर्तमान येकंदर अल्लीयदिल् शाहास कळून या उपरी निजामशाहाची दौलत राहणार नाहीं. तो मारला तरी पडावुतरी जाईल. परंतु धारागिरीचा किल्ला फार मजबूत; तैसा किल्ला दर्याखानाचे हातास लागल्याने तो असल्यास नित्य नूतन शल्य होईल, यास्तव तो धारागिरीचा किल्ला आपल्या स्वाधीन ध्यावा ह्मणून अल्लीयदिल्शाहा आपल्या फौजेनिशी चाले करून धारागिरी वरी आले. ही बातमी दिल्लीस पावली तेव्हां दिल्लीचे तक्त जांहगीर बादशाहास होते. त्यानी देवगतीस पावून त्यांचे बलदायक अलंगिरी बादशाहा ज्यास प्रत नाम अवरंगजेब ह्मणूनहीं ते अवरंगजेब निजामशाहानी पादशाहा आपली करावी ह्मणून सर्वत्र निघून आले. हे बातमी समग्र शाहजीराजास पावली. त्यानी, हे कोणत्यास जातें पाहूं ह्मणून आपल्या स्थळींच राहिले. तेव्हां अवरंगजेबानी आपल्या वडिलांकडून प्रेषित होऊन आला ऐसा दर्याखाना सहित धारागिरीच्या किल्यावरी येकयाबाजूस मोरचे देऊन युद्धकेले. तैसें ची एकयाबाजूस अल्लीयदिल्शाहानी मोरचे देऊन युद्धकेले. त्यांत निजामशाहाचा निर्वाह नाहीसा दौलत समग्र बुडून जाऊन आपणहीं

औरंगजेबास स्वाधीन होऊन गेला. सेवेंच त्या अवरंगजेबानी अलीयदिल्-शाहाशी युद्ध करून पळवून आपण देवगिरी दुर्गांत स्थाई होऊन राज्य परीपालन करूलागले. तेव्हां सातार गडांत होतेते शाहजीराजे यानी केली तजवीज, जंवरी निजामशाहा आपल्या दौलतेनिशीहोते, तंवरी अलीयदिल्शहा दिल्हेश्वरऐसा औरंगजेबासी मिळून होते. प्रस्तुत धारागिरी दुर्गानिमित्त अलीयदिल्शाहास औरंगजेबासी विरोध प्राप्त झाल्याकरितां औरंगजेव आपल्या फौजेनिशी मात्र राहिले. या उपरी अलीयदिल्शाहाची औरंगजेबाची मिळणीहोणेंनाहीं करितां आपल्यास पेसजी निजामशाहानें जाहगीर दिल्ही, तो देश आतां आपण साधूये ह्मणून निश्चयकरून आपुल्या जाहगीरच्या देशाचें व्याज्य करून देवगिरीदुर्गराज्याखालील ऐंशी दुर्गेहीं शाहजीराजानी साधून आपले केले. तेव्हां शाहजीराजाची दौलतेची व शौर्याचेही आधिक्यता पाहून इतर राजे व सरदार शाहण्णो कुलाचे मराटे होते, ते समग्र शाहजी-राजासी मिळाले. त्या शाहण्णौ कुलाचा विस्तार थोडा जाणवितो. जो छत्रियवंश सूर्यापासूनहीं चंद्रापासूनहीं ब्रह्मदेवापासूनहीं वृद्धीतें पावला ह्मणून भारत, भागवत, हरिवंश, रामायण ही ग्रंथांत विस्तारें सांगीतलें. त्यांत सकल वंशासहीं मुख्य मूल ब्रह्मदेवापासून अलीकडे चंद्र सूर्य हे समग्र कारण जाहले. तत्रापि ब्रंह्म वंश व सूर्य वंश व चंद्र वंशाचे राजे येकास येक मिळणीही आहे करितां, मुख्य ब्रंह्म वंशांत मरीच, त्या पासून कश्यप, त्या पासून सूर्यनारायण, त्या पासून वैवस्वत मनू ,त्या पासून उत्तानपाद राजाचे संततींत दांभीकराजा, त्याचे सहालेंक, त्या पासून राजवंश झाला आहे. तैसेंच सूर्यवंशांत रामचंद्राचे लेंक कुशलवापासून वंश विस्तारला आहे. तैसेंच चंद्रवंशांत चंद्राचा लेंक बुध, त्याचा लेंक आयु, त्याचा लेंक नहुष, त्याचा लेंक ययाति त्या पासून पुरू राजा, त्या पासून राजवंश विस्तारला आहे. त्या त्रिवंशा पासून विस्तारिली क्षत्रियकुलें शाण्णोची नावनिशीः-

“भोंसले, घोर्पडे, लिंबाळकर, जाप्त्याप, नळवंदे, किकाडे, शदे, सावत,

निकम्काकड, फडके, माने, इदलकर, भिसले, मोहिते, शिरके, फडतरे, काळे, अगरे, पुंवार, होलकर, वणगे, रणनवरे, अटाले, पाहतसे, करजादाळे, पोलवा, फडसाळ, खेडगळे, बहुगुण, मोरे, सावंत, सूर्यवंशी, सोमवंशी, यादव, मस्तके, लोखडे, शिंगाडे, दळवी, घांटके, सनगर, गायकवाड, देवकर, जाधव, सोनवणें, लांडर उदारे, पिसाळ, विरज, राय, जाहे, भाडलकर, घुजाठे, शिशोंग, शिरसाठे, भानदुर्ग, कांडे, करांडे, गाळिंगरूड, गावाडे, दुमाल, रणपिशका, पुशे मठले, ठोके, गुजर, खडदोन, कुराहे, शलके, शिलार, गाडे, काटकर, महडीक, वानविरे, वितरे, वाघमारे, वाघचवरे वाघ, कस्पाडे, शितोले, शिकरे, वाबर, इगवळे, नारदिवे, बोघळे, बरूगर, इंसाफ, आहारकर, अवारे, दूनमोताटे, तगठ, लगड, कल्याण, करटोंवर, शंकर, बालके, येणे प्रमाणें तमाम मराठे सरदार शाहजीराजासी मिळाले ". तेणेंकडून शाहजीराजाची दौलत अधीक वाहडली. हे वर्तमान दिल्हेश्वरास पावून, त्यास केली तजवीज, येणेप्रमाणें होणेस मुख्य कारण अलीयदिलशाहास आह्मी पळविल्या करितां जाहले. यास्तव आतां अलीयदिलशाहा आह्मी येकमत होऊन शाहजीराजास उणें करावें ह्मणून दिल्लेश्वर ऐसे औरंगजेबानी तजवीज करून अलीयदलशाहास संविधान करून येक होऊन उभयतांहीं शाहजीराजासीं युद्ध योजून भीवरा तीरी येऊन उतरले. तेव्हां, शाहजीराजानी, तमाम यवनास मारून निर्नाम करितों ह्मणून तीन वर्षे युद्धकेले. तेव्हां शाहजीराजाचे आराध्य दैवत स्वप्नांत येऊन तुजकडून यवनाचा नाश होतनाहीं, ते कारण पुढें कित्तेक दिवसानंतर तुझे लेंकाकडून होणार करितां आतां यवनाशीं संधी करून घेण ह्मणऊन आज्ञापिले. त्या ईश्वर वचनाचा अंगीकार करून शाहजीराजानी नूतन निजामशाहाचेमुलुक आपण बांधिला तो समग्र दिल्हेश्वर औरंगजेब व विजापुरचें अलीयदलशाहा उभयतांस वांटून देऊन सोडून आपण आपल्या स्वराज्य सातारगड नगरांतच राहिले; उपरी कित्येक

दिवसानंतरें औरंगजेबास व अलीयदिल्शाहासहीं विरोध पडला. तेव्हां अलीयदिल्शाहानी शाहजीराजे आपले वडील इब्राहीमखानाचे स्नेहित आणि शूरहीं जाहल्याकरितां आतांहीं त्याचा स्नेह राखावा ह्मणून शाहजीराजास बलावून पाठवून बोलून आपल्याकडील सरदार रणदुल्लाखान् ह्मणणारास बरोबरी देऊन दक्षिण प्रांतचे राज्य वगैरे औरंगजेबास तोफा देणार समग्रास स्वाधीन करिणें ह्मणून पाठविले. शाहजीराजे तेणेप्रमाणें निघून दक्षिण प्रांतचे राजेलोकांस जिंतले नावनिशाः– विधुपुरचाराजा वीरभद्र, कोंगदेशाचाराजा कोंगनायक, कावेरीपट्टणाचाराजा जगदेव, श्रीरंगपट्टणाचा राजा कंटीरव, तंजापुरचा विजयराघवराजा, चंदीचा राजा वेंकटनायक, मधुरेचा राजा तिरूमल नाईक, वालीगुंडापुरचा राजा अरिकाल वेंकटनाईक, विधानगरचा राजा रंगशायीनायक, इंसकूटपुरचा राजा तन्नोगोडनायक, वरकडपालेपट्टचे राजे कित्तेक या इतुकया रांजांसहीं जिंतून करभार यापासून घेतला. तो समग्र अलीयदिल्शाहास पाठविलें. तेणेकडून शहामजकूर फार संतुष्ट होऊन नूतन बेंगळूरचे राज्य आपण स्थापिले होते ते पांन सुपारीस शाहजीराजास जाहगीर दिल्हे. शाहजीराजानी बेंगळूरास येऊन पाहते वेळेस किल्ला मजबूत, स्थळहीं वासयोग्यसे भासल्या करितां सातारांतून संसार तमामास बलावून पाठवून घेऊन आपण बेंगळूरींच वास्तव्य करून शिवाजीराजे व येकोजीराजे उभयतांस सकल विद्याभ्यास करविले. तेव्हां शिवाजीराजे यांसी बारा वर्षाचे वय झाले. शूरहीं जाहले. त्या समयीं शाहजीराजास स्वप्नांत श्रीसांबशिवानी येऊन शिवाजीराजास येथें ठेऊन घेऊनका; या कडून उदंड कार्य होणार आहे, त्या करितां यास सातार पुणें प्रांतास पाठवून द्या ह्मणवून आज्ञापिले. तेव्हां शाहजीराजानी ज्येष्ठ भार्येपासून जाहली संतती येकोजीराजे जाहले करितां वयानी धाकुटे झालेतरी मानास हेच वडील ह्मणुन आपलें युवराज्यपदें व बेंगळूर तक्तहीं शके १५६२ विधुसंवत्सरी देऊन आपली बिरूदें समग्रहीं येकोजीराजास देऊन आपले

कुलदैवतहीं येकोजीराजास देऊन शिवाजीराजास सातार पुणें प्रांताचे राज्यास शके १५६२ विषुसंवत्सरीं तक्त बांधून पाठविले. तदनंतरें शिवाजीराजे सातारगडास पावून अजूबाजूचे गड, किल्ले, दुर्गे कित्येक बाळाई मुलुकूचे बांधून राज्य करूं लागले. शाहजीराजे बेंगलूरीच होते. त्यांस अल्ली-यदिलूशाहानी दोन तीनदा बलावून पाठविले. त्यास शाहजीराजे निराकारण करूं लागलेशेच होते, त्या वरून अल्लीयदलूशाहास, शाहजीराजे बलाविलियां येत नाहींत; त्यांचेलेंक शूर होऊन बाळाई मुलुक बांधीत बसले आहेत. पहिल्यापासूनच शाहजीराजे शूर, आतां त्यांचे पुत्रहीं शूरच जाहल्या करितां शाहजीराजे चढून गेले आहेत ह्मणावयाच्या वैषम्यानें कपटें कडून शाहजी-राजास धरून कैद करावे ह्मणावयाची योचना करून मुस्तफूखान् नाम सरदार मोटा कपटज्ञ त्याला पाठविणेचा निश्चय करून, त्या बरोबर दिलावरखान्, फरीदखान, हैबति राजाचालेंक बल्लाळराजा, मसूदखान, अज्जमखान, सजारखान, राघवराजे झराटे, यादुहखान्, बाजीराजे झराठे, अंबरखान्, वेदाजीभास्कर ब्राह्मण, जोहरखान्, कणरचा प्रतिनाम कन्नोळ यासरदारांस बरोबरी देऊन हरउपाय कडून शाहजीराजास जीत धरून अणावे ह्मणून सांगून मुस्तबूखानास बेंगळूर प्रांतास पाठविले. तो मुस्तबूखान् बेंगळूर प्रांतास येऊन शाहजीराजास सांगून पाठविला जे, अल्ली-यदिलूशाहा बादशाहा कडून अन्यत्र कार्यास्तव आज्ञापित होऊन मी आलों आहे. त्यास तुह्मासी भेटून तजबीज करून मग कशास प्रवर्तणेस निरोपिले आहेत करितां अगत्य भेटीस यावे, बोलणें आहे ह्मणून सांगून पाठविला. तेव्हां मुस्तफूखानाची कपट योचना शाहजीराजास जाणवली तरीहीं, आह्मी बाळायतीचा मर्यादेस उणें कां करावे, याच्या कपटानें काय होणें आहे, पाहूनघेऊं, ह्मणून येकोजीराजे यास आधिपत्य समग्रहीं दिल्हे होतें. परंतु, त्यांचें वय लहान झाल्याकरितां यांचे व दुर्गाचेहीं संरक्षणास ज्येष्ट पुत्र संभाजीराजास ठेऊन आपण समागम घेतले सरदार खंडाजी ह्मणून माना-

मानाजी ह्मणून, तानाजी ह्मणून, बंधूजी, मांडवलकर, दशदीत ह्मणून, मेघजित ह्मणून, हे सातहीं शूर व आप्त जाहल्याकरितां, यांस घेऊन मुस्तबूखान चे भेटीस गेले. तेव्हां कितेक अपशकुनहीं जाहले. परंतु त्याची परवा करीनासें जावून पावले. तेव्हां मुस्तबूखानानें फार मर्यादेनें भेटी घेऊन उदंड उपचार करून आणखी आपल्यास तजवीज करिणें आहे करितां दाहा पंधरा दिवसाचे कामास आपण येथेंच उतरावें ह्मणाले. येणे प्रमाणेंच शाहजीराजानी या समीपच स्थलांत आपले डेरे देऊन उतरले. मुस्तबूखानानें शाहजीराजास पातेरा होईजेसे स्नेह नित्यनूतन वाहडवीत आला. परंतु राजे यास विश्वासले नाहीत. बाहेरंगास आपलें कपट राजास कळलें नाहीं ह्मणून मुस्तफूखांनास भासावें यानुसार होते. तेव्हांहीं राजाचे डेरांत अपशकुन चिन्हेंच उदंड दिसू आली. त्या वरून ते स्थल त्यागून राजानी आपल्या दुर्गात येऊन पावले. देवप्राबल्यास्तव येथेंच राहिले. तेव्हां मुस्तबूखानाने येके दिवशी रात्री आपल्या बरोबरी आल्या सरदारांस शाहजीराजाचा डेराघेरून घेणेस निरोपून आपणहीं त्यांचा पाटीराखा होऊन शाहजीराजास ही सूचना कळली नव्हती करितां आपल्या सरदारांनिशी डेरांत सुख करीत होते. येकायेकी अर्धरात्रीं डेऱ्यास सरदार लोकानीं येऊन घेरून घेतले वर्तमान राजाकडील सरदारानीं राजास उठऊन सांगीतले. तेव्हां राजे हुशार होऊन घोड्यावरी स्वार होऊन आपले सरदारांनिशी युद्धाभिमुख होऊन युद्ध केले. तेव्हां बहुत लोकांस जाया करून फारवेळ युद्ध केले. शेवट खानमजकूराकडील सरदार बाजीरायांसी युद्ध करितांना बाजीरायांचा हात चालन शाहजीराजे जखमी होऊन घोड्याखाले मूर्छागत जाहले. सेवेची बाजीराजे व मुस्तफूखानहीं शाहजीराजा जवळ येऊन राजास अनेक उपचाराने मूर्छा सावध करून जखमहीं बांधून राजास अंबारींत बसवून विजापुरास अलीयदिल्शहाकडे पाठविले. शाहजीराजाचे ज्येष्ट पुत्र संभाजीराजे बेंगळूरीं होते. त्यांस मुस्तफूखानानें केलें कृत्रिम व

शाहजीराजास विजापुरास पाठविले वर्तमान सांग्रत कळून संभाजीराजे मुस्तवूखानासी युद्धास तयार झाले. इतुकयांत मुस्तवूखानानें बेंगळूर किल्ला साधावयाचे तात्पर्येंकडून युद्धास आला. उभयतांस युद्ध लागले. हे वर्तमान समग्रहीं शिवाजीराजास कळून त्यानी शेना सन्नद्ध करून अलीयदिल्‌शाहावरी चाले करिणेस शिद्ध जाहले या दो टांयींचे वर्तमान अलीयदिल्‌शाहास कळून अलीयदिल्‌शाहाने बेडरचा यजमान बल्लाळ, फत्तेखान्, मुझेखान्, या तीघे सरदारांस युद्ध सन्नाह व सेनाहीं देऊन शिवाजीराजानी पादशहाहीं गड किल्ले बांधिले, ते समग्र सोडून शिवाजीराजे आहेत ते स्थल पुरंदरगडास धाऊन शिवाजीराजास हस्तगत करिणे ह्मणवून निरोपून पाठविले. उपरी त्या त्रिवर्ग सरदारानीहीं शिरोबल ह्मणावयाचागड शिवाजीराजानी आक्रमिला होता, तो घेऊन तेथें बेडरचायजमान बल्लाळास टेऊन, फत्तेखान्, मुझेखान् दोघेहीं शिवाजीराजे होते, त्या पुरंदरगडास वेढा दिल्हे. तेव्हां शिवाजीराजानी आपले शेनापती भीम ह्मणणारास बलावून फार रागा भरून या क्षणीं तुह्मी जाऊन शिरोबलाचा किल्ला घेऊन ठाणे ठेऊन येणे ह्मणवून निरोपून, आपण फत्तेखान हुशेखानासीं युद्धास सन्नद्ध जाहले. भीम शेनापती जावून शिरोबलाचा किल्यास वेढून चहूंकडे मोर्चे देऊन तोफखाना नवीबाणाचा मार केले. तेव्हां बल्लाळाकडील सैनिकसमग्र डोसकें दाखविनासें किल्यांतच दडाले. भीम शेनापतीनी चहूंकडून किल्ला पाडून हल्ला करून आंत शिरून खत्तल करिण्यांत बल्लाळासहीं मारून टाकून किल्ला स्वाधीन करून घेऊन आंत आपलें ठाणें बसवून अपण निघून शिवाजीराजाकडे आले. त्यानी पावत्या अगोदरी फत्तेखान, मुसेखान उभयतानी फौज तयार करून घेऊन पुरंदरगडावरी हल्ला करून फौज चढून गेले. तेव्हां शिवाजीराजानी वरील किल्यांतून जबर मार करून कित्तेक फौजेकडेंलोट करून कित्तेकांस तोफानें व भांडयानें व बचीनें व तरवारानें मारून व शीशें तावून ओतून ऐसा जदर मार करून हल्ला परतून सोडविले. तदनंतरें दुसरा

कितां फत्तेखान हुशेखान आपल्या फौजेनिशी संधीपाहून येकायेकी पुरंदरगड तमाम चढून जाऊन किल्याचा दरवाज्यास जावून लागले. तेव्हां शिवजी-राजे आपल्या जवळील थोडें लोकांनिशी बाहेरी निघून अपल्या अंगेकडून महायुद्ध करून फौज तमाम मारून काढून, आल्या दोघे सरदारांपैकी हुशेखानासहीं मारूनटाकिले. फत्तेखान पळून गेला. त्या बरोबरी त्याची फौजहीं गेली. त्या उपरी शिवाजीराजे बाहेर निघून सेना सन्नद्ध करून अलीयदलशाहावरी जाणेस सिद्ध जाहले. इतुकयांत शिरोबल दुर्ग साधून भीमसेनापतीहीं येऊन पावले ऐसे असतां चित्रकल्ल दुर्गाचे राज्य करणार विचकतीभरमा ह्मणणार मोटा शूर त्याची शेना'समीप राहावयाचें स्वार उजव्या बाजूस तीनी हजार स्वार त्याचे तरवारास मेण सोन्याचे डाव्या बाजूस तीन हजार स्वार-त्याचे तरवारास मेण रूप्याचे; त्या खेरीज मागें पुढील जिलेबचे वेगळेच. या खेरीज चित्रकल्लदुर्गाचे प्यादे फार जबरदस्त; तैसे प्यादेहीं त्याकडें फार. या सन्हानिशी त्याने सर्वदा अलीयदिलशाहाचा मुलक व विजापुरची पेट देखील मारून लुटून घेऊन जाणे ऐसें बहुतदा करीत आला. तो त्या किल्यासहीं पहिल्या प्रमाणेंच जाऊन विजापुरची पेट लुटून गेला. तेव्हां अलीयदिलशाहानी तजवीज केलीजेः- दक्षिणेकडे बेंगळूरास मुस्तबखानास पाठविले ते जे करिताती परंतु संभाजीराजे स्व वशास याबयाचे दिसत नाहीं. चित्रकल्ल दुर्गाचा भरमा विजापुराची पेट देखील मारून लुटून घेऊन जातो. पुणें प्रांतास मुसेखान व फत्तेखानास पाठविल्या पैकी शिवाजीराजानी हुसेखानास मारून टाकिले. फत्तेखान सर्वस्वहीं गमावून जीवानिशी येऊन पावला. आतां शिवाजीराजे फौज तयार करून विजापुरावरी चाले करावयास सिद्ध जाहले आहेत. शिवाजी राजे वरप्रसादी आणि शूरहीं. कोठें गेल्याहीं जयच पावणार ; तशानीं चाले करून आल्यावरी विजापुरचा विचारहीं संशयांत आहे करितां, यास मुख्य योचना करून शाहजीराजास कबूल देऊन मोकळे करून यां कडून

हे राजकारण येकंदर थोपावें ह्मणवून हृदयोचना करून शाहजीराजास कैदेंतून मोकळें करून भेटीस बलावून शाहामजकूरानी ह्मणाले ; राजेहो ! तुह्मास व अमचे वडील इब्राहीमखानासहीं बहुता दिवसापासून स्नेह ; तुह्मां कडूण इब्राहीमखानासहीं उदंड कामें जाहली ; इब्राहीमखानानी तुह्मास बहुत उपकारकेले. प्रस्तुत अह्मीहीं तुह्मास तसेंच चालविले. तुह्मास दक्षिण प्रांतास आह्मी पाठविल्यास तुह्मी सांगीतल्याप्रमाणे काम मात्र केले. परंतु तुह्मी आह्मापासी न येतां बेंगळूर जाहगीर तुह्मास दिल्याकरितां संसारहीं आणवून तुह्मी तेथेंच राहून गेलां. तुह्मी आह्मा जवळी असावें ह्मणून तुह्मास बलावणेस्तव मुस्तफखानास पाठविलो. त्यानी वेघळयाच रीतीनें तुह्मास पाठविले. असो ; आतां ते कोपातें मनीं धरूनका. आताहीं तुह्माम आह्मास संधी हेचकीं, तुमचे पुत्रशिवाजीराजे यानी अमुचे सिंव्हगड घेतले आहेत. ते गड आमुचे आह्मास सोडून द्यावें. तुमचे ज्येष्ठ पुत्र संभाजीराजे बेंगळूरांत असून मुस्तफखानाशी भांडताती. त्यास व तुमचे संसारासहीं सातारासी बलावून घेऊन बेंगळूर सोडून द्यावें. तिसरें, चित्रकल्ल दुर्गाचा भरमा फार लबाडा करितो ; त्या वरी मोहिम करून त्याला स्व वशास आणावें ह्मणाले. या तीनी गोष्टीसहीं शाहजीराजानी अंगीकार करून उभयता पुत्रांस लिहून पाठवून सिंव्हगडहीं सोडविले, व संभाजीराजे व येकोजीराजे उभयतां संसारा सहित साता-यांत येऊन राहणें ह्मणवून बेंगळूरहीं सोडूनदिल्हे. आपणहीं फौज तयार करून भरम्यावर चाले करून गेले. शाहजीराजे चित्रकल्ल पावले तेव्हां भरमा बागामध्ये माशाची शिकारी खेळत होता. त्याला त्याकडील लोकानी अल्लीयदल्लशाहानी फौज पाठविले आहेत. त्या फौजेंत शाहजीराजे येताहेत ह्मणून सांगीतले, तेव्हां भरमा आपुला बिरूदाचा घोडा आणवून स्वार होवून वरी लिहिल्या-प्रमाणें सन्नाहहीं बरोबरी घेऊन युद्धास आला. शाहजीराजानी त्यासीं चांगले युद्ध करून आपले हातानेंच त्याला मारून भरम्याचे डोसकें कापून

रुमालांत बांधून घेतले. त्याच्या घोड्याची बिरूदें ताजवस, ज्याव, तोडेंहीं तीनी बिरूदें काहडून घेऊन त्याची फौजहीं कित्येक लुटून घेऊन राजे विजापुरासी पावून अल्लीयदल्शाहा समोर भरम्याचें डोसकें व त्याच घोडयाची बिरूदें तीनीहीं ठेऊन खुरनिशि केले. तेव्हां अल्लीयदल्शाहा अत्यंत संतोष पावून, त्यानी आणिली बिरूदें त्यांसच देऊन आपल्या सकळ बिरूदांनिशी भरली सदर शाहजीराजास बकषीस केले. सदर बकषीस केल्यांत शाहजी-राजास लाभली वस्तू :- हिरवा मखमली डेरा, जिलेबाचा तास नगारा, येकट सदरेचा हिरवा मखमली चांदनी, सोन्याचे कलशासहित सोन्या रुप्याच्या अंबाऱ्या हत्तीसहित, जिलेबचे सदरेंतील नंगी संशेखाले, बाछाईचे बाजूचे विच्चकत्तीचे भरम्यास मारून घेतली घोडयाची बिरूदें, नव्हतां बाछाईचे सदरेंतील जिलेबेचे घोडयाची बिरूदें घोडया सहीत ताजवस ज्याचा हुमा देखील मोहिमरत व चंद्र सूर्य वाद्य, सोन्या रुप्याची चारेखणी डेरा, हिरव्या मखमलीचे सदरेना थोर्ला व पत्रापडदे जगाली त्यांचें रेशमी तमवे, त्या डेऱ्याचे पांय, त्या चडते ठायींचा चांदनी हिरवी मखमली व त्याचे हिरे जडित त्याचे कलशदेखील, व रेशमी तिवाश्या, तक्त खासजीच्या पांयाच्या त्यावरी घालावयाच्या सुजन्या देखील, व डेऱ्या खालील सुतर नळयांच उंठ, व हिरव्या सखलातीचे निशानाचे हत्ती, व सोन्या रुप्याचे मोलम्याचे पाखरा व दांतास लाविल्या सनिना, हिरवे मखमलीचे शेरेमाशेसहित पाऱ्याचे हत्ती; इतुकया सन्नाहानिशी भरली सदर बकषीस केले. ते समग्रहीं शाहजीराजे पावले. शाहजीराजे तो बहुत मान समग्र पावून अल्लीयदल्शाहाचा निरोप घेऊन सकल बिरूदें विशेष संपदेनिशी साताऱ्यास आपले संसारांत पावून सुखी राहिले. आता शिवाजी राजाची प्रख्यातता झाल्याचा विस्तार जाणवितों. आपुले वडील शाहजीराजे यानी अल्ली-यदल्शाहा पासून मोकळीक होणेस्तव लाभलें राज्य देखील सोडून साताऱ्यांत येऊन राहिल्यावरी शिवाजीराजे पुरंदरगडांत होते.॰ त्यानी आपला मंत्री

सुवर्ण नामक ब्राह्मण, त्यास सोनाजी पंत ह्मणून येक त्यास बलावून येकांती सांगीतले जे अमुचे वडील शाहजीराजे परम शूर आणि योगवंतहीं, त्यानी केली कामेंहीं निर्मळ मने करून केले. परंतु त्यांत थोडा भाव सुचतो. तो काय ह्मणजे प्रथम निजामशाहा संगतीस होते, ते अलीयदिल्शाहाचे बोधनेवरून त्याकडे आले. परतून निजामशाहानी बलावितांच त्याकडे गेले. पुन्हा अलीयदिल्शाहाकडेहीं आले. ऐशा दोनी तीनी येरधारा जाहल्या. तशाचे संगतीस जीतके दिवस होतेकी त्यात्याची कामें निर्वंचन करून करूनहीं त्यां त्यास यांचे ठायीं कपठच भासावयाजोगें जाहले. परंतु आपले ह्मणून विश्वास धरावयास ठाव नाहीसें जाहले. त्यां त्यांस त्य त्ययांना कार्य करण्यावांचून सरनाते कार्यास यास आपले करून घेऊन कार्य शेखर करून तदनुसार मान बहुमान केले, येवढच. परंतु मनेंकरून हे आपले ह्मणून मानावयाजोगी करणी वडीलां करून घडली नाहीं. ते कैशी ह्मणजें, थोर मनुष्यानी येकाची संगती धरिल्यावरी त्याशी विगडताच नयें. कदाचित् बिगडावयाजोगे (संभवलेतर) परतून त्यांशी मिळूनयें हे तो प्रसिद्ध नीति असतां या रीती चालून बोलेइतुकयासहीं, वडील अंगेकरून शूर आणि निर्वंचनें करून वर्तल्या करितां कृत्रिमी यवनांपासून वडीलांस ईश्वर राखिले. आह्मी प्रयासाने घेतलें सिंव्हगडहीं व आपण बहुत प्रयासें करून संपादिले बेंगळूरहीं यवनास सोडून देऊन सातान्यांत येऊन राहिले. आतां त्यांस वृद्धाप्य दशाहीं आली. या उपरी आह्मास सुचल्या बुद्धीनुसार जावें. अलीयदल्शाहाकडे वडीलांनी अनेक प्रयास केले; तरीहीं त्यांचे चित्तांत आह्मी जड जाहलों. आह्मास तोडावे ह्मणूनच आहे. तसेच निजामशाहाचे राज्य बांधून घेऊन देवगिरी दुर्गांत आहे त्या अवरंगजेबासहीं आह्मी येक शल्य होऊन आहो. आह्मास तोडावें ह्मणावयाचेंच आहे. हे दोन प्रबल शत्रूमध्ये आह्मी पुरंदरगडांत असून राज्य करावें ह्मणिजे आह्मास कदापी चालणार नाहीं. येखांदे वेळेस दगा करून

अह्मास बुडवतील; या करितां आह्मी बाहेर निघून या दोघांसहीं अवरावें तेंव्हांच अमचा टिकावा होईल. हे तजवीज तुह्मास मानते काय ह्मणून विचारिल्यास, त्यानी उत्तर दिल्हे जे- महाराजानी केली तजवीज इतुकीहीं खरीच. प्रस्तुत महाराजानी योजिलें कार्यहीं करावेंच; ईश्वरहीं साह्यहोईल ह्मणून त्यानी जबाब दिल्हा. त्यावरून, महाराज शिवाजीराजे फौजेची संजोगनीत्व यवनावरी राजकारणास प्रवर्तले. तो विधः— प्रथम आह्मी, या दोघानीहीं सर्व प्रयास केल्याहीं, त्यांचा यत्न चालेना त्या ठिकाणी राहून मग वरकड तजवीजेस प्रवर्तावे ह्मणवून स्थल परामृश केल्याठायीं पश्चिम प्रदेशीं विराट देशांत साधपर्वताचे घाटा खाले पश्चिम समुद्रतीरा समीप देश लोहपर्वतप्रातीं प्रतापगडास समीप जयवल्ली नगर आहे ते स्थल बहुत कुबल. तेथें कोणाचाहीं लाग नाहीं. वाटेस घाटहीं कुबल करीतां ते स्थल आक्रमावे तरी वाटेस बहुत राजे आहेत. ते राजे समग्र अल्लीयदल्-शाहास तोफा देणार; त्या समग्रास मारूनच ते स्थल साधावें ह्मणावयाचा दृढ निश्चय करून यास प्रथम सिंव्हगड साधिला, तो शाहजीराजाचे मोकळीकेस्तव अल्लीयदल्शाहास सोडिला होता, तो परतून घेऊण त्या सिंव्हगडास अधिकरून आपले गड किल्यांत समग्र सामान रस्त व फौज हे समग्र भरून बंदोबस्त करून आपण बरोबरी घ्यावयाची फौज, धारकरी, चांगला रावूत निवडून आपल्या सेनास पाहिजे तितुकी शेना पादचारीच विशेष घेऊन बरोबरी कोणती रस्तहीं माघून यावा ह्मणावयाची अपेक्षा न धरावयाजोगी सुलभांन घेऊन प्रयाण सिद्ध करून, अनेक द्रव्य दक्षिणायुक्त यात्रादान करून, देवता प्रार्थना कुलदेवताराधना विशेष करून, प्रयाण समयीं कुलदेवता प्रत्यक्ष होऊन स्वप्नांत जयप्रद ऐसा दृष्टांतहीं दिल्हा. तोहीं पाहून जयभेरी ठोकून सुमुहूर्तें विजयदशमीचे मुहूर्तानें कूच करून चालिले. विजयदशमी सणांस कूच केलें ह्मणजें भोंसल वंशांत जयप्रद दिवस तोच ह्मणून परंपरा चालिले. या करितां उत्तम शकुनहीं जाहले. त्या शकुन

सुमुहुर्तानिशी कूच करून जाते वेळेस आरंभापासून जयवल्ली नगर पावेतोहीं वाटेस निबिड वन, निबिडपर्वत संधींत वनांतहीं अनेक देशाधिपती, दुर्गाधिपती, पाळेगार, जमेदार, त्या सर्वत्रांसहीं मारिल जातां स्थल सोडून पळालेतेहीं, जातां सांपडले यास मारणारास मारून, सोडून देणारास सोडून बंदीखाना दाखल करणार त्यां त्या जोगें योग्य स्थळांत घालून यांत थोर थोर राजे बाजीराजे येक, कृष्णराजा येक, जनकराजा येक, चंद्रराजा येक, या चौघांसहीं जिंतून, त्या जिंतिल्या राज्यास येकंदर मजबूत ठाणी विश्वासूक सरदारांस ठेवून, मागील पाउले आपलें करून, पुढें चाले करून जयवल्ली नगर पावले. त्या नगराची थोरवी थोडी कळावयास्तव सांगीजेली होती जे–सिंव्हे पर्वताच्या शिरेस घाट उतरून या घाटास रडतोंडीचा घाट ह्मणूनहीं नावपावलें आहे. त्या घाटाची कुबलता प्रख्यात; तसा घाट उतरून येकपद मार्गानें बहुत दूर जावून लोहपर्वताचा माथा चढून खाली पाहिल्यां समग्र निबिड वन त्या वनांत सूर्य रस्मि पडल्यां भूमीवर गोष्पाद मात्रहीं पाहण्यास सांपडेना; शुद्ध अंधकारमय तैशा वन दुर्गाच्या आवरणा मध्ये जयवल्ली नगर. त्या नगरा समीप प्रतापगिरी दुर्गही; तेस्थळहीं जिंतूनि, तेथील रामचंद्रराजा ह्मणून वरी राहिला तो त्यालापळवून, आपले स्वाधीन करून, तदनंतरें त्यास्थलांत व प्रताप दुर्गांतहीं मजबूत ठाणी ठेऊन पलीकडें स्वार होऊन पश्चिम समुद्र तीरीं उतरून समुद्रामध्ये कित्येक प्रदेशा पलीकडे कांठास विशेष दूर नाहीसे येक किल्ला मजबूत बांधून त्यास शिवलंका ह्मणून नांव ठेऊन त्या शिवलंकेच्या किल्यात वस्तीहीं करून, रत्नखचित सिंव्हासन येक करून, त्या सिंव्हासनावरी आपण बसून, शिवशक ह्मणून येक शक कल्पून, सकल हिशोब कितोब वगैरे लिहिण्यांत शिवशक घालून, लिहिजेसें आपुलें अधिकाराचे भूमीस समग्र आज्ञापून, येणे प्रमाणें चालवून, आपण तेथें राहीले. जयवल्ली नगराचा चंद्रराजा पळून गेला, तो अल्लीयदलूशाहापासी पावून शिवाजीराजाची ख्यांती व शौर्यधैर्यादि

कृत्य समग्र अलीयदलूशाहास जाणती केली. ते अलीयदलूशाहाने पर-माश्चर्य मानून ते वेळ पावेतो शिवाजीराजे अमुके ठांयीं आहेत ह्मणाव-याचें देखील कोणासहीं कळलें नव्हतें. चंद्रराजानी सांगीतल्या वरून अली यदिलूशाहास त्या शिवाजीराजाचा कृत्याचे ठायीं आश्चर्य व असूया विशेष होऊन सर्व प्रकारें शिवाजीराजास खाली करावें, नाहीतरी आपलें अधिपत्य टिकणें कठीण ह्मणून दृढ योचना करून, त्याचे बारा वजीरांपैकीं अफजल खान ह्मणणारा मुख्य वजीर त्याला अब्दुलखान ह्मणून प्रसिद्ध आहे त्या अफजलूखानास बलाऊन,तुह्मी पादशाहाचे रफाक माधें बहुत कामें केलां आहां; बहुत मुल्क साधिलाहीं आहां ; तुह्मा मुळें बादशाहास नांव आहे. आतां शाहाजीचा ल्योंक केवळ शिवाजी उन्मत्त होऊन बापाची गोष्टीहीं ऐकनासे आपण अतिक्रमून बाच्छाई मुलुकें तमाम बांधून, बाच्छाई खजान्यास न्यावयाचें द्रव्य लुटिलें होतें, नव्हतां प्रस्तुत बाजीराजा, कृष्णराजा, जनक राजा, यांचा मुलुक् बांधून, पलीकडे चंद्र राजाचा मुलुक जयवल्ली नगर प्रतिनाम जावळी ह्मणावयाचें स्थलहीं आक्रमून, समुद्रामध्ये किल्ला बांधून शिवलंका ह्मणून नावें ठेऊन, जडित सिंव्हासन करून, आपण बसून, आपले शक देखील चालविलें. उपरि तो काय करीना, याकरितां तुह्मी विशेष फौज विशेष खजाना घेऊन, तुह्मा बरोबरीचे वजीर अकरा आहेता त्यांसही बरोबरी घेऊन जावून बहुत बुद्धीनें शिवाजीराजा तें धरावें अथवा, मारून तरी टाकावें ; त्या विना आमुचा टिकाव होईना ह्मणून सांगी-तल्यास अफजुलूखान कबूल होऊन सकलसैन्यहीं अकरा वजीरांस कृष्णाजीपंत वकीलास बरोबरी घेऊन निघणेस सिद्ध जाहला. इतुक्यांत शिवाजी राजे पुणेंस येऊन पावले ह्मणून वर्तमान आले. तेव्हां चंद्रराजाने सांगीतलेते शिवाजीराजे तेथून निघून पुणेंस आले ते येथ्या कामास बरेंच जाहले. जावळी गडांत असलियां त्याचा लाग करिणे बहुत प्रयास तो पुणेंस आल्या करितां परतून त्याने येवूनि पावतो इतुक्यांत आह्मी

पंढरपुरावरून निस्संग जावळीगडास जावून, जावळी व प्रतापगड साधिल्यां ते शिवाजी मैदानांत पडला; त्याचें पारपत्य सहज करूये ह्मणून सल्ला दिल्हा. त्या चंद्र राजाचे सल्यास युक्त मानून अफजलखान कूच करून निघाला. तेव्हां उदंड अपशकुनहीं जाहले. मुख्य फत्तेलश्कर ह्मणणार बाछाईचा खांस हत्ती जो निशानाचा तो हत्ती पहिल्या मजलेस देवगतीस पावला. तेंहीं अलक्ष करून अफजलखान पंढरपुरचे मार्गाने प्रथम जावळी गड प्रताप गड साधून मग शिवाजीवरी परतावें ह्मणावयाचे योचनेने चाली केली. तेव्हां शिवाजीराजाचे कुलदैवत श्रीजगदंबा तुळजा भवानी राजास रात्रिकाळीं प्रत्यक्ष होउन, अफजलखानाने केली योचना, अली-पदल्शाहाने निरोपिला अर्थ अफ्जलखान कपटाने स्नेहाचे सन्निधान करील, त्यास पातेजाता नयें ह्मणूनहीं, त्याक्षणी पुणें सोडून जावळी गडास पावणें, तेथेंच अफजलखानाचा संहार मी उभी राहून तुजकडून करवितें ह्मणून सांगीतली. सवेंच राजे उठून देवीस नमस्कार करून देवी अप्रत्यक्ष जाहल्यावरी स्वप्न पाहिलें ह्मणावे तरीं जागाच आहे; अत एव कुल-देवता प्रत्यक्ष होऊन पुढिलें भविष्य जाणविले ह्मणून संतोषमानून त्याक्षणी पुणें प्रांतचे गड, किल्ले, दुर्ग समग्र मजबूत करून आणि जावळीं गडास प्रयाण जाहले. तेव्हां वाटेचे गड किल्लेंत होते त्या सरदारांस येकंदर संकेत सांगून ठेविले जे अफ्जलखान बहुत सैन्यानिशी जावळीस पंढरपुरचे मार्गानें जातो इतक्यांत आह्मीहीं जाऊन पावतों तो आह्मासीं भेटीचे सन्नि-धान बोलेल. आह्मीहीं त्या प्रकारेंच बोल देतों. तुह्मी आपले आपले गड किल्ले मजबूत करून फौज मात्र दाखऊन देयीनासे राणांत दबऊन ठेऊन अफ्जलखान् येणारास त्याचे फौजेनिशी धाराळ सोडूंदेणे; जावळीचे मैदानांत त्याची अमुची भेटी झाल्या ठायीं संविधान बिघडल्यां, त्या घडीस संकेताचा नगारा वाजवितों; तो शब्द ऐकल्याक्षणी तमाम बाहेर निघून तमाम घाटा बांधून, त्याचे एक मनुष्य देखील आंत येऊन

देईनासे आंतील येकासहीं बाहेर सोडीनासें ज्याला जेथें देखिलें तेथें मारून टाकिणें. येकमनुष्य सोडणें गरजनाहीं ह्मणून सांगून, आपण संकेत करून वाजवावयाचा जिनसहीं त्यांस कळवून आपण जावळी जावून पावले. उपरि अफ्जल्खान् परामर्ष केल्यांत शिवाजीराजे जावळीस पावले ह्मणावयाचे कळून पढंरपुरचे मार्गानें जाणार वाटेनें न जातां विठोबाचे मूर्तीस उपद्रव करावयाची योचना केली. त्यास विठोबा अप्रत्यक्ष होवून त्या वेळेस मूर्ति दृष्टीस पडेनासी झाली. त्या उपरी तुळजापुरास पाऊन तुळजाभवानीचे मूर्तिसहीं उपद्रव मांडिला. तेथेंहीं मूर्ति अप्रत्यक्ष जाहली. तेथून निघून शंभूमहादेवास येऊन उपद्रव आरंभिला. तो बरोबरी साहा वजीर मराठे होते, तेहीं आडवें येऊन अटकाविले. त्यामुळें, तेथून निघून पल्लीवन ह्मणावयाचे पालीचे गडास आला. तेथेंहीं देवानें कांहीं चमत्कार दृष्टांत दाखविल्यामुळें उपद्रवकरीनासे तेथें राहून कृष्णाजीपंत वकीलास भेटीचे संविधान बोलणे ह्मणून राजाचे नांवें अफ्जल्खानाने पत्र लिहिले जें—तुह्मी कितो जाहल्याहीं अल्लीयदल्शाहा बादशहासी विरोधव केलां, तुमचे नातें तैसें नव्हें. तुमचे वडील शाहजीराजानी केले वर्तणूक ऐकिलीं असाल की आतां तुह्मी बादशाहा किल्ले येकंदर बांधिले, व बादशाही मनसूबदारांस येकंदर मारून टांकिलां, बादशाही खजानें लुटलां, रत्नसिंव्हासन येक करून, त्यावरी बादशाहा होऊन बसतां, या खेरीज तुरूकाचे मतास निंदितां, जेथें तेथें मशीदा तोडितां, ऐसा येकंदर द्वेष बाढवितां, करितां तुह्मी बादशाहीस गुनेगार जाहलां आहां. अल्लीयदिल्शाहाचे चित्तांत तुह्मास उदंड रीतेनें कष्ट द्यावें ह्मणावयाचे वाटलें. त्यास, शाहाजीराजाच्या स्नेहा करितां वादशाहास उदंड रीतीनें सांगून तुह्मी बांधिल्यायैकीं सिंहगड, भीमरथी, पुरंदरगड, जयवल्ली, येवढें, सोडूनदेणें यथा प्रकारें तुमच्या देशांत तुह्मी सुखरूप असणें ह्मणून वारून घेऊन आलों आहों करितां तुमची अमची भेट जाहल्यावरी वरकडहीं कळून येईल ह्मणून लिहून कृष्णाजी

पंताकडे देऊन, आणखी कृष्णाजी पंतास कपट युक्ती निरोपून शिवाजी राजाकडे पाठविले. त्याने राजापासी येऊन केवल आप्तकीने बोलून भेटीचे संविधान सांगीतलें. त्यास शिवाजीराजानी अंगीकार करून फार उत्तम. अमचे अपेक्षित कार्यच खानानी सांगून पाठविले. ते फार उत्तम जाहले. खान मजकूरानी या जयवल्ली नगर जावळीचे मैदान, येथील रान येथील गड व हे काहीं पाहिले नाहीत कीं, येयेंच आलीयां भेटे गोष्ठी यथास्तिती होती ह्मणवून सांगून पाठविले. ते वर्तमान कृष्णाजीपंत वकीलाने येऊन सांगतांच खानमजकूर बहुत संतोष पावून फौज कूच करून चालिले. तेव्हां बरोबरीचे वरकड वजीरानी त्या स्थळास जाता नयें; शिवाजीराजा सामान्य नेव्हें; काहीं कपट करील ह्मणवून उदंड रीतेनें सांगीतलें; व अपशकुनहीं फार जाहले. कोंणतेहीं मानीनासें लोहपर्वताचे उतारांत जावळीचे वनदुर्गास बाहेर उतरून रांजास सांगून पाठविले. तेव्हां राजानी घाटा बेटा समग्र बांधून पलीकढिले मनुष्य घाटांत येऊन देईनासें घाटा तमाम झाडें तोडून खान मजकुराचे लोकांस आपण आलीवाट देखील आपणास कळेंनासें करून आपलें गडें, दुर्ग, किल्ले समग्र मजबूद करून पुणें प्रांताकडील –वहली नवी संपादिल्या मुलकांतही त्या त्या ठाणेदारांस आपण संकेताचा नगारा वाजवितांच तो शब्द ऐकिल्याक्षणीं चहुंकडील फौज खवळून अफ्जलखानाकडील येक मानव देखील सोडीनासे मारून टाकणें ह्मणून ताकीद करून, आपण जावळीचे वनदुर्गा आंतील मैदानांत सदर करून खान मजकूरास भेटीस बलावून पाठविले. ऐशा समयीं शिवाजीराजास वर्तमान आले जेः–अफ्जलखान विजापूर सोडून येते वाटेस नवी मुलकें आह्मी बांधिला, तो बांधीत व लुटे करीत येणेप्रमाणें येत असतां तुमचे ज्येष्ठ बंधू संभाजीराजे काहीं फौज घेऊन युद्धास गेले, त्यांस घेरून कलहा अधी देऊन कुलमे करून मारून टाकिलें. ते वर्तमान शाहाजीराजास कळून त्यांचे उत्तर कार्य जाहल्यानंतर त्या व्यसनांनें थोडें

दिवस असून शाहाजीराजेहीं परमपदास पावले. त्याचा दिवस —शके १५८० विकारी संवत्सरीं संभाजीराजे देवगतीस पावले. सवेंच दोन महिन्याचे अभ्यंतरांत तोचशक त्यांचे वडील शाहाजी राजेहीं परमपदास पावले. त्यांचे उत्तर कृत्य येकोंजी राजानी केले. मातोश्री जीजाई आऊसाहेब तुमचे भेटीस आले ह्मणून वर्तमान सांगीतले, तेव्हां शिवाजी-राजानी फार क्लेश मानून जीजाई आऊस बलावून घेऊन, भेटून समाधान करून आऊसाहेबांस प्रतापगडावरी ठेऊन, संभाजीराजाचें उसणें घेतो ह्मणून रागानें असते वेळेस तेव्हां अफ्जलखान येक पालखी व कृष्णाजीपंत, हेजीबें चौथे पांचजण खिजमतगारानिशी सदरेस आले. उपरि शिवाजी-राजेहीं तदनुसारच दोघे चौघे बरोबरी घेऊन भेटीस आले. येकास येक भेट होते समयीं थोडी बोलाबोली होऊन अफ्जल्खानानें राजास गवसून धरून माजेची कठार काढून राजाचे पोटावरी चालविली, दोन तीन मार चालविले; तरीहीं राजानी अंग्या आंत बारीक बखतर ल्याले होते, ते कोणासहीं कळेना. त्यामुळें राजाचे पोटावरी चालविली कठार व्यर्थ होऊन गेली. इतुक्यांत राजानी वरचेवरी हाताच्या विसऱ्यानें मार दाखवून डाव्या हाती वाघ नंखे होती त्याने अफ्जल्खानाचे पोटावरी मारून ओढिले. तेणेंकडून पोट चिरले जावून चरबी बाहेरी आली तरीहीं खान मजकूर तक्त जाइल्या करितां तेचबी पोटांत आपले हातें भरून दुशालाने पोट ओढून बांधून हाती फरंग घेऊन राजावरी वार करूं लागला. तेव्हां राजानी हाती पट्टा घेऊन खान मजकूराचे वार येकंदर पट्यावरी आडवून आपण वार करून, तो वार खान मजकूराचे डाव्या भुजापासून उजव्या बाजूच्या बरगड्या पांवेतो उतरल्यामुळें खान दुर्घट होऊन खाले पडला. तेव्हां शालीवाहन शके १५८१ विकारी संवत्सर मार्गशीर्ष शुद्ध सप्तमी गुरूवारी दुपारा अफ्जल्खान पडला. खान मजकूर देवगतीस पावल्यांनंतर खानाची तरवार कृष्णाजींपंत हेजिराणे घेऊन राजावरी वार करूं लागला.

तेव्हां राजे ह्मणाले जेतूं ब्राह्मण तुला मारणें आह्मास धर्म नव्हे. आह्मी ब्राह्मणचरणरजासच पूजा करितों. आह्मास गुरू देवता स्थानहीं ब्राह्मण आहल्या करितां हाताची हत्त्यारा टाकून देऊन तुला जावें सारिखें असल्यां सुखरूप जा. घाटा मोकळ्या करून देतों. अथवा येथेंच राहावें तरी अन्न वस्त्रास चालवितों. रहा ह्मणून उदंड रीतीनें सांगीतल्याहीं, त्या ब्राह्मणानें ऐकनासे बारा करी बार चालविला. तो समग्र ओहडीत परतून पाहिनासे राजे चालिले. तेव्हां राजाचा खिसमजदार येकानें पाहून ब्राह्मण हट्टास पेटून मारितो; येखादा मार चुकून लागल्यां कोट्यावधी जनास पोसणार राजा जायां होईल; तत्रापी शस्त्र धरून मारणार ब्राह्मणास सुखें मारूये ह्मणून त्या कृष्णाजी पंतास मारून दुघड केला. तो ब्राह्मण देवगतीस पावल्यावरी शिवाजीराजानी पूर्व संकेता प्रमाणें नगारा वाजविला. तो नाद ऐकतांच जेथिले तेथें लोक खवळून अफूजलूखानाची फौज तमाम मारून वरकड वजीरांस धरून फौजेंतील हत्ती घोडे तमाम लुटून राजापासी आणून पावतें केले. राजानी सांपडल्या वजीरांस बहुमान करून पाठविले. ते वजीर, बहुत शेष थोडें होते, तोहीं अल्लीयदिलूशाहापासी जावून साद्यंत वर्तमान जाणतें केले. अल्ली यदिलूशाहानी अफूजलूखानाचे वर्तमान ऐकून दोन घटिका आपले ठायीं खिन्न होऊन, बहुत फौज सरदारहीं गेलेकीं ह्मणावयाचे व्यसनानें मग्न होऊन पुन्हा हम्म धरून शिवाजीराजावरी लढाई करावी ह्मणून फौज बंदी करूं लागले. हे वर्तमान, पेसज्जीं शिवाजीराजे अफूजलूखानास मारणे निमित्त जावळीस जाते वेळेस पुणें प्रांताचे राज्य समग्र नेताजी ह्मणणार सेनापतीस निखून जावळींत आपण संकेत नगारा वाजविला वर्तमान कळतांच चालावयाची घटिकहीं सांगून गेले होते. तो नेताजी ह्मणणार सेनापतीनें, अफूझलूखान दैवगतींस पावले वर्तमान ऐकून अल्लीयदिलूशाहानी पुन्हा युद्धार्थ फौज बंदी करितांती ह्मणावयाचें ऐकून अफूजलूखान् जावळीस राजाचे भेटीस जाते वेळेस ठाणी

ठेविल्या गड किल्ल्यांत येकंदर त्यांची ठाणी ठेऊन, अपली ठाणी मजबूत ठेऊन आपणहीं राजाजवळी जावळीस जाऊन पावला. तदनंतरे, शिवाजीराजयानी नेताजी सेनापतीस बरोबरी घेऊन अल्लीयदिल्शाहाचा मुलुक बांधिला. तो पश्चिमनगर संपगावरासवड हे शाहार किल्ला सहीत घेऊन, यास अधिकारी होता तो अल्लीयदिल्शाहाकडील हिलालखानास पडाऊ केले. तोहीं निर्मल मनेंकडून राजाचा अंकित झाला, त्यालाहीं समागमें घेऊन शिवाजीराजानी अल्लीयदिल्शाहाचा मुलक व दिल्लींद्र औरंगजेबाचामुलक देखील बांदिल्या नावनिशा किल्ले, दुर्ग गड देखील. मायावनी, रामपुर, कलधूतिका, जयंतिका, अष्टी, अष्टवठ, वेल्लापुर, उंबरगांव, मसूर, करहाताग, गावें, पल्लीकाने, रलकन, नारबटु, मुरण, कोकपुर, करवार; येणेप्रमाणें तमामें राज्य बांधून यांतील सरदारांस कित्तेकांस कौलावरी सोडिले कित्तेकांस मारून टाकिलें कित्तेकांस बदीखानीघालून साधिल्या राज्यास येकंदर मजबूत ठाणी ठेऊन तदनंतरे नेतोजी सेनापती समागम सेना देऊन, अल्लीयदिलशाहाचा मुलक व दिल्लींद्र औरंगजेबाचे मुलकहीं बाधणें ह्मणून निरोपून पाठवून आपण पणालगड साधावा ह्मणून येऊन पणाल्यास मोर्चे देऊन गडावरी चाल केली. तेव्हां गडावल्यानी अनेक गोळयाचा मार व उदंड शीसें तावून ओतिले. या प्रकारीं बहुत मार केले. ते कोणतेंहीं गणना करिनासें शिवाजीराजे गडावरी चढून हल्ला करून, किल्लाहीं घेऊन, आंतिले सरदारांस मारून, येकून मारिले लोक जातां उरल्यांस सोडून देऊन, पनाळगड संग्रह करून घेऊन तेथेंच राहिले. यास काहीं अगोदरीच अल्लीथदिल्शाहानी तजवीज केली, जे – शिवाजीराजे केवळशूर प्रस्तुत प्रतापगड जयवल्ली प्रांती आहेत, ते पुणें पनाळगड समीपच करितां तिकडे येतील. ते पणाळगढ फार चांगला आह्माला प्रियकर आस्ती होऊन आहे. कदाचित तो गड शिवाजीराजाचे हातास लागल्यां, मग आह्मास फार संकट जाईल या करितां तो राखावा ह्मणून रुस्तुमखान ह्मणणार सरदारास बरोबरी जोर

फौज देऊन पनाळ राखणेस्तव पाठविले. तो रूस्तुंखान येऊन पावतो इतकयांत शिवाजीराजानी पनाळ हस्तगत केले होते; ते वर्तमान रूस्तुमखानाने अलीयदिल्शाहास लिहिले ते पाहून अलीयदिल्शाहा फार व्यसनग्रस्त होऊन, पनाळगडहीं शिवाजीराजानी साधिल्या करितां, या उपरि शिवाजीराजे आह्मास दुर्जय; बहुत राज्य बांधिले, बहुत फौजहीं जमला, आह्मा येकल्याच्यानें त्यास जिंकवेना ह्मणून दिल्लींद्र ऐसा औरंगजेबास अलीयदिल्शाहानी कागद लिहिले, जे- "शाहाजीराजाचे लेंक शिवाजीराजे केवळ तुंद होऊन, तुमचा व अमचा मुलूक बांधिला, तो मात्र नव्हतां अमचे तुरूकाचे मताचे जे देखिले त्यांस येकंदर मारितात्ति. मशींदा तमाम उपडून सांडिल्या; जडित सिंहासन येक करून, त्यावरी आपण बसून आपल्यास बादशाहा ह्मणविताहेत. आपल्या नावें शिव शक ह्मणून शक चालवितात्ती; ऐसें येकंदर उन्मत्त जाहले आहेत. अमच्या आटोप्यांत येत नाहीत. अमचे पनाळगडहीं स्वाधीन करून घेतले; यास्तव तुह्मी फौजा पाठविल्याने अमची फौजहीं बरोबरी देऊन पाठऊन शिवाजीराजास ठांयांस आणितों. ह्मणून लिहिले. ते पाहून औरंगजेबानी अनेक मोगलाई फौज बरोबरी देऊन जुलुफकारखान ह्मणणार सरदारास पाठविले. त्या जुलुफकारखानानें अलीयदिल्शाहाकडील सरदार पहिले पनाळ राखणेस पाठविले होते, त्या रूस्तुमखानासहीं मिळून घेऊन पनाळ प्रांतास बहुत सन्नाहानिशी उभयतां आले, तेव्हां शिवाजीराजे आपल्या फौजेनिशी बाहेर निघून पुणें प्रांताकडे समोर येऊन जुलुफकारखान व रूस्तुमखानाची फौज तमाम मारून टाकून जुलुफकारखानचा निशान हिरून घेतले. तेणें कडून सैन्य समग्र वाताहत होऊन, जुलुफकारखान पराजय पावून निघून गेला दुसऱ्याकित्ता जुलुफकारखानानें दर्याखान्, फत्तेखान, मुसेखान ऐसे थोर सरदारांस भारी फौजहीं घेऊन आला; तैसाच अलीयदिल्शाहानेंहीं फौज पाठविले, तेहीं घेऊन आले. दुसऱ्या कित्ताहीं राजे बाहेर निघून भांडून सैन्य वाताहत

करून सोडिले. पुन्हा जुलुफकारखानानें जाऊन फौज बंदी करून आला. येणे प्रमाण जुलुकारखान व अलीयदल्‌शाहानी फौज सोळा किते युद्धास आले. सोळा कितेहीं युद्धांत राजानी फौज तमाम मारून, उभयतांची फौज नाश होऊन गेली. हे वर्तमान हतशेषांचे सांगण्यावरूनहीं व अलीयदिल्‌शाहानी लिहिल्यावरूनहीं औरंगजेबानी विचारिले. तेव्हां जवळच्यानी सांगीतले जेः— शिवाजीराजा जयवल्ली, चक्रावती या प्रांतासहित अनेक बाछाई किल्ले, गड, शाहार साधून पनाळगडहीं घेऊन आपण पनाळ गडांत बैसला आहे. त्याचा सेनापती नेताजी ह्मणणार बाछाई मुलुक साधीत आला आहे. त्या नेताजीनें साधिला मुलुक अली यदल्‌शाहाचे मुलुकांत कपित्यगांव १, बंदरगांव १, मलगांव १, कडल १, गोकाक १, दुग्दवाठ १, सुखट १, धांरावट १, पोरगांव १, मतपळ , फागाद १, कदमवट १, हेणवट १, रायबाग १, दुमौरिका १, काडग्राम १, कमलापूर १, चित्रकूट १, काराळ १, गारयाव १, शामगांव १, सतमीर घड १, हरिद्रा १, क्षुईवट १, ईवल १, धूणिका १, मिरजे १, हनुवल्ली १, माथोल १, कुणिक १; इत्यादि राज्य आणखी कित्येकही बांधिली. ते नव्होतां बाछाई मुलूक तमाम लुटणें जाळणें येणे प्रमाणें किरात नेताजी प्रबळ आहे ह्मणून सांगीतले. तेव्हां औरंगजेबानी आपला थोर वंशास मिळाला खिनरी सरदार मुसेखान पठाण १, गोड विठ्ठलदास म्हाटा १, पाठरू १, गिरजासुलतान १, अमरसिंव्ह मराटा १, कोकाटे १, शादीवदीखान १, सरजेराव म्हाठा १, राजेबगान १, बदल्‌खान् पठाण १, रामसरू म्हाटा १, कारतकबखान १, जयामादु १, कृष्ण राजे १, या नावनिशीचे समग्र देऊन शास्ताखानास निरोपिलेजेः—शिवाजी कडील नेताजी बाछाई मुलुकांत करावयाची धुदाईस शतांशानें अधीक पुणें प्रांती जाळणें लुटणें येणे प्रमाणें करीत जयवल्ली चक्रावती प्रांतावरून तो प्रांत समग्र साधून पनाळास जाऊन शिवाजीचें पारपत्य करा ह्मणून शास्ता-

खानास भारी फौज देऊन पाठविले. त्यानीहीं आपल्यास झाल्या हुकु-मापेक्षा जास्ती घर दाया करीत मुलुकहीं बांधीत चक्रावती प्रांतास चालिले. येणे प्रमाणें आज्ञापित होऊन बाछाईचा मामा शास्ताखान निघावयाचें वर्तमान अलीयदिल्शाहास कळून आतां पनाळांत आहे त्या शिवाजीराजास हे वर्तमान कळतांच आपण निघून समारे जाऊन शास्ताखानास येऊं देयीनासे तेथेंच रोधील करितां त्याला त्या पनाळ्यांतून बाहेरनिघेनासें करावें ह्मणून कनोळचे जोहरखानास लिहिले जेः—तुह्मा समागमें वल्लीखान व बाच्छाईखान व घोरपडे वगैरे संरदारांस व भारी फौज व भारी सरंजाम घेऊन पनाळास जाऊन सक्त लढाई करून पनाळगड व शिवाजीसहीं हस्तगत करणें ह्मणून लिहिले. ते पत्र जोहरखानाने पाहून - अतीत्वरेनें सेना व सरदार सरंजामहीं शेखर करून घेउन पनाळावरी उतरून गडास पांच महिने वेढा दिल्हा, तरीहीं शिवाजी राजानी चांगलें भांडणें भांडत होते. शास्ताखान् औरंगझेबाकडून निघाला तो चक्रावती प्रांतीं संग्राम दुर्ग वेढून भांडत होता. त्या संग्राम दुर्गातील शिवाजीराजा कडील ठाणेदार शास्ताखानास संहारिनासें चांगलें भांडणें देत होते. येणे प्रमाणें शिवाजी-राजे पांच महिन्या पासून पनाळगडांत जोहरखानाचे वेढ्यांत सांपडून युद्ध करीत असतां राजमाता जीजाई आऊसाहेब प्रताप गडावरी थोडे दिवस असून तदनंतरें परतून राजगडास पावले होते ते जीजाई आऊसाहेब प्रस्तुत राजेहीं वेढ्यांत सांपडले. तेथेंहीं संग्रामगड चक्रावती शास्तखानाने वेढिला; तेव्हां जीजाई आऊ साहेबांस, शिवाजी राजास पाहावें ह्मणून तेवढा येक पुत्र आपल्यास आहे. कोणा रीतीहीं त्यास पाहावें ह्मणावयाची अपेक्षा जाहली; दुसरे कित्येक सेना घेऊन जावून राजास मोकळें करावें ह्मणा-वयाची हावहीं धरून जीजाई आऊसाहेब पनाळ्यास जाणेस सिद्ध जाहले. पुन्हा आऊसाहेबानी केली तजबीजः— जे संग्रामगड चक्रावती दुर्ग शास्ता-खानाचे हातास लागल्यासें दिसतें, पुणेंसी सरळी सूप गावें हेहीं

ताम्रमुखाच्या हातास लागलें; शिवाजीराजे पनाळीवेढेंत आहेत करितां आपण जाऊन सोडवावें ह्मणून निश्चय केले. तेव्हां राजाचा सेनापती नेतोजी ह्मणणार हिलालखाना समवेत येऊन नम्रतेनें नमस्कार केला. मातोश्री त्या दोघां पाहून, माझा लेंक तुमचा यजमान पनळगडीं शत्रूशीं युद्ध करितो ; तुह्मी उभयतां लाज नाहीसें भिवून आपला प्राणच थोरसा समजून पळून आलांकीं त्यास्तव मीच जाऊन माझ्या लेंकास सोडवितें ह्मणतांच सेनापतीनी मातोश्रीचे प्रथम राजे असाध्यशूर त्यास्तव त्यांचे निरोपावरून विजय गड जिंतून ये प्रांती तांम्रमुखीसी युद्ध करिणेस आलों. आपण येथेंच आमुचें संरक्षण करावें. पनाळास न जावें ; नाहींतरी अमचे सैनीक समर्थ ताम्रमुखासी जिंतून गड किल्ले घेउं सकनात. आह्मीच यजमाना समीप-जातोंसें राजमातेस विज्ञापना करून पनाळेस निघालें. तेव्हां सेनापती सह सैन्य येणेचे वृत्त जोहरखान ऐकून व काहीं सैन्य पाठवून मार्गी निरोधितां उभयता सैन्यासहीं अद्भुत युद्ध जाहलें, त्या युद्धीं हिलालखानाचा पुत्र अनेक पराक्रमें करून धायानें धाबरा जाहला. त्याला यवनाचे लोकानी धरून नेले. हे वर्तमान कळूनहीं सोडवणेस शक्त न जाहले. हे वर्तमान राजानीहीं ऐकून व्यसनानें रात्रीं निद्रिस्त असतां श्री तुळजाभवानी स्वप्नी येऊन, अरे लेंकरा तुझी माय राजगडात तुजलागी पाहावें ह्मणून बहुत कष्टी होते ; आतांच मातोश्रीचे भेटीस, स्वल्प सैन्या समवेत जा ; ते समयीं शत्रूस मी मोहवितें. जोहरहीं कारणामुळे नाश पावेल; ह्मणतांच राजे जाग्रत होऊन श्रीदेवीस साष्टांग नमस्कार करून, पुणें प्रांत ताम्रमुखानि आक्रमिले असती. येथें आह्मी असणें विहित नव्हें. ही तजवीज करून त्र्यंबक भास्कर यांस पनाळी ठेऊन देवीच्या आज्ञे प्रमाणें राजगडास जाणें निश्चयकरून जोहरास, आपण राजगडास जातों आमुचे सैन्य येथें तुह्मासी समर करील; कदाचित ऐसें तुजला संमत नसल्या उभय दलभारहीं दूरसें करून आह्मी दोघेहीं द्वंद्व युद्ध करूंसे राजानी सांगून पाठविले. ते वर्तमान

ऐकूनहीं न ऐकल्यासें होता. तदनंतरें राजे रात्रीं प्रहरानंतरें साहासें पाय दळासहीं तेरी वाजवीत शत्रू समीप मार्गानें चालिले. तेव्हां तो शब्द मेघ गर्जना ह्मणून शत्रू समग्र समजले. तेव्हां राजेहीं कठोंण मार्ग राणाचा पांच गांव भोयक्रमून विशालगडास पावले. त्या नंतरें ते वर्तमान जोहरानें ऐकून, आह्मी घेरिलें असतांहीं कैसें दगा करून गेले ह्मणून तप्त होऊन, महसुद ह्मणणार सेनापती समागमें काहीं सैन्य देऊन राजास धरणेस्तव पाठविला. तो महसूद तेथून जातानां मार्गी चिखोलांत बहुत सेना गडून गेली. काहीं सेने समवेत गडा समीप पावला. त्यां अगोदरी पल्लीवनाचा राजा जशवंत, शृंगारपुरचा राजा सूर्यराजे दोघेहीं जोहराचे निरोपावरून विशालगडी युद्ध करून पराभव पावले होते. त्यानी, महसूद आले वर्तमान ऐकून त्याची भेटी घेऊन तीघेहीं विशालगडास घेरिले. तेव्हां राजे नीट युद्ध करून स्वसैन्य कडून शत्रूस जिंतून, तेथून निघून राजगडास येऊन आपले मातोश्रीस साष्टांग नमस्कार करून चालले वर्तमान येकंदर सांगून, येक दिवस तेथेंचि राहिले. महसूदहीं केवळ अपमान पावून प्राणानी जोहराकडें पावला. हे वर्तमान दिल्लीश्वराचा मामा शास्ताखान प्रभृतीनी ऐकून आपले मनोरथ सिद्धी विषयी संशयी जाहले. ऐसें असतां, शिवाजीराजे आलोचना करून त्र्यंबक भास्करास, पनाळगड यवनाचे स्वाधीन करून तुम्ही येथें येणे; त्या गडास प्रतिनिधी अल्लीयदिलशाहापासून इतर गड घेवूं सकतों; दोनी ठायी युद्ध करिणे होईना, करितां हा निश्चय समजून शीघ्र येणेसें बलावून पाठविल्यावरून त्र्यंबक भास्कर राजे आज्ञानुसार गड जोहराचे स्वधीन करून त्याची भेट घेऊन, त्याकडून अनेक सन्मान पावून राजा समीप येऊन पावले. ऐशा समयी यदलानें राजास, जोहर लांच घेऊन सोडिलासे अनुमान मानून, जोहरास, राजाकडून लांच घेतलास तें द्रव्य देणे; नाहीतरों तुझे पारपत्य केलें जाईलसें पत्र पाठविलें. ते पाहून मनस्तापें कडून अपलें सैन्य घेऊन कर्नपुरास निघून गेला. आपलें भय

नाहींसें निघून गेला ह्मगावयाचे द्वेषानें कित्येक ताम्रमुखास पाठविला. त्या ताम्रमुखानीं विष देवून जोहरखानास मारिले. राजगडांत शिवाजीराजयानीं ताम्रमुखी, चक्रावती, आणिसंग्राम दुर्ग भांडून घेतले वर्तमान ऐकून मंत्रीस बलावून आतां ताम्रमुखावरी युद्धास जावयास अनेक द्रव्य पाहिजे, त्यास्तव कित्येक राजे जिंतून यावेसें ह्मणतांच मंत्री प्रत्युत्तर दिलें जेः– महाराजानी केली तजवीज युक्तच. युद्धासहीं निघावे ; परंतु दिल्लीश्वराचा मामा सांप्रत पुणेंत आहे. तो, महाराज राजगडास आलें वर्तमान ऐकून आमचे राज्य सिंह पर्वत प्रांत आक्रमिणेचें योजून कारतलब ह्मणणारास काहीं सैन्य समवेत पाठविणेस निश्चय केला आहे. त्यास्तव तो मार्ग निरोधावा ह्मगतांच ते ऐकून आपण सैन्यानिशी जयवल्ली प्रांतास जाऊन खालील आंतील राणांत लोक दबवून ठेविले. त्यानंतरें कारतलबखान व अमरसिंह आणि राजे व्याघ्री व जशवंत व सूर्य राजा व कोकाटे व मित्रस्नेह ; हे समग्र सैन्य समवेत निघून भीमपुर व कल्याणपुर व पनवल्लीपुर व कक्षपदेश हे समग्र स्वसैन्य समेत निघून भीमपुर वगैरे स्वाधीन करून घेऊन, लोहादीचे राणचे मार्ग सिंह पर्वत उतरून त्या खालील राण परदळ समेत होते ते न कळतां राणीं प्रवेशून दोन तीन दिवस वास करून पलीकडें साधणेस निघाले. तेव्हां शिवाजीराजे समोर निरोधिले. दो भागी होतेते राज सैन्यकहीं घेरून उंम्रगांवचे राणांत बहुत युद्ध केले. उभयतांस युद्ध होताना यवन सैनिकास युद्ध शक्ती नाहीशी जाहली. तेव्हां राजव्याघ्री ह्मणणारी सरदारीणे कारतलबखानास पाहून, ह्या राणी दिल्लीश्वराचे सैन्य समग्र हत करिणेस इच्छितोस ; शिवाजी राजे तुजला जीवानिशी सोडीत नाहीत. त्यास्तव त्यासच शरण जाऊन, येथून चुकून जाणें बरें ह्मणतांच, ते युक्तसें समजून कारतलब आपले हेजीबास राजा समीप पाठवून भखसा घेऊन येथें आले होते ते राजे समग्र आपलें सर्वस्वही राजास देऊन शास्ताखानाकडे निघून गेले. त्या नंतरें शिवाजीराजे फार संतोशनें शत्रूनें दिल्हें

सकल सैन्य व द्रव्य घेऊन व आपला मंत्री नेताजीसि तजवीज करून पुनश्च ताम्रमुखाचे राज्य स्वाधीन करणे निमित्त दालींथपुरास जावून तो देश स्व वश आणून पल्लीवन प्रांतास गेले. त्या देशाचा राजा जशवंत, पूर्वी राजाचे भयेंकरून, पूर्वी शृंगारपुर व प्रभावळीं पट्टणाचा प्रभू सूर्यराजा समीप पळून गेला. तो राजाहीं याला संरक्षण करीत होता. ते राजे पूर्वी अपराधी असूनहीं पराधीन; त्यामुळें त्यावरी अपराध न मानितां उपेक्षा करून चिलपुळीन दुर्गास जावून तेथें श्रीपरशुरामस्वामीचे दर्शन घेऊन बहुत पूजन करून श्रीभार्गवा पासून वरहीं संपादून त्या प्रांती त्यानी दिल्हा करभार घेऊन ब्राह्मणास बहुत दान धर्म देऊन संगमेश्वर दुर्गास गेले तेथील म्लेच्छ पूर्वीच राजभयेंकडून पळून गेले. तो देशहीं स्वाधीन करून घेऊन तेथेंच जशवंतानी नीलकंठ राजाचे पुत्र ब्राह्मण मलपूरचा वंशस्थ; त्याने जितासमवेत राजाचे निरोपावरून संगमेश्वरास येऊन पावले. तदनंतरें महाराजानी सूर्यराजावरी दयाकरून संगमेश्वरी माझें सैन्य आहे, तुमचेसें समजणे; काहीं दुर्बुद्धि न करिणेसें राजास हरका-या समागमें सांगून पाठवून आपणास शरण आले ते राजलोकांस अभय देऊन राजपुरास पाठवून, तेथें असूनच समुद्रतीरींच राहणार कित्येक फरंगाव द्वीपांतरीं असणार समुद्रांत जाहजाचा व्यापार करणार व समस्त राजांस स्व वश करून, त्यांकडून अनेक करभार घेऊन, आंणि राजपुरीं असतां शिवाजी राजास अंजन न घालितां बहुत द्रव्य मोहराचे कढाया दृष्टीस पडल्या तेहीं घेऊन आणि बहुत सामान त्या त्या देशाधिपतीकडून करभार आणवून त्या कडून घेतिला सामान सोने, रूपें, पोलार, शीशें, तांबें, लोखंड, काळे शीशें, कांशे, पश्चिम समुद्रांत सोन्याची वाळू होती, ते, मोते, मरकत, पद्मराग, वज्र, पोंवळीं, लाख, खड्गपात्रें, शिंगचामरें, शिखिग्रीव, व चाक्षुषी, व त्याविना हे तीनी वस्तू-अ[illegible] बाल्हाक, चरक, लोध्रक, गुग्गुळ, पावलाशक, मंजिष्ठा, नागसंभव, पारा, हरिताळ, गंधीसामान, नराळी गंधक,

गोरोचन, अभ्रक, वत्सनाभी; आदिकरूनी विषवस्तू, विष परिहार औषध, जरीमाल कपडें, शालाचे जिनस कापडें, रेशमी जिनस कापडें; तेहीं घेऊन, बहुत नाजूक सामानें, त्यां त्यां कडून घेऊन आपलें समस्त दुर्गांत पाराचांत ठेऊन, तदनंतरें शटवल्लीचे समदळ व हरिचरी व नैखनाथ व कुत बटकेला वल्लीक शनवल्लीका व नाधवाट पासून धांवे सावळा वटचक्रारपट्टण ऐशे देशाचेराजे राजा कडून करभार घेऊन सकल देशहीं स्ववश करून घेऊन राजापुरांत होते. ऐसें असतां यदलानें शिवाजीराजास काहीं शल्य करिणेस सूर्य राजास लिहून पाठविल्या वरून त्याने संगमेश्वरांत त्यसां रात्री रोघिले. त्याला मलसूराने सुसामर्थ्य अद्भुत युद्ध करून मारून पळविले सवेंच शिवाजीराजे राजगडाहून संगमेश्वरास येताहेत असें वर्तमान ऐकून मलसूर प्रभृति राजसुन्मुख येऊन दर्शन घेतले. तेव्हां नीलकंठ राजाचे पुत्राने तानजिताचे सामर्थ्य महाराजास कळविलें. ते ऐकून त्याला व सकल लोकांस बहुत सन्मान करून सूर्य राजावरी राग क्षमा करून पुनश्च हरकार्यसमागमें आपण पल्लीवन प्रदेश घेणेस जातों, तू बहुत अपराधी जाहल्याहीं, क्षमा करून तुजला जीव भरवसा दिल्ला आहे. शीघ्र सावध होऊनी राहणेसें सांगून पाठविलें. ते ऐकून आपण येतोसें सांगून पाठविले परंतू, न गेले. राजे पल्लीवनास जावून ते राज्य गड किल्ले समग्र आपलें स्वाधीन आणून तेथील लोकांस अभय देवून पूर्वीहून अधीक वस्ती वसवून तेथें चिरदुर्ग ह्मणून येक पर्वत होता त्यावरी येक नूतन प्राकार बांधून मंडतगड ह्मणून नाव ठेवून कांहीं सैन्यहीं तो प्रांत रक्षणार्थ ठेऊन श्रृंगारपुर घ्यावें ह्मणून रागानें पंधराहजार सैन्यासहित निघाले. पूर्वीच श्रृंगारपुर न घेतां सांप्रत रागकरणेस कारण काय ह्मणाल्यां शिवाजीराजानी जयवल्लीगांव साधार्थच ईश्वरावतार असें समजून सूर्यराजास आपण महाराजाचा क्रयपुत्र ह्मणून शरण आला होता. त्यानंतर वारंवार बहुत सेवाहीं करीत होता. सांप्रत ग्रहचारवशें दुर्बुद्धीकडून यवनाचे गोष्टीवरून द्वेष आरंभिला.

तरीहीं अपराधें क्षमाकरून बलावून पाठविलें असतांहीं येतों ह्मणून न अल्यामुळेंहीं राजास बहुतराग येऊन निघाले. ते शृंगारवनासमीप येऊन पावले. हे वर्तमान सूर्यराजाने ऐकून पहिले आपण अनेक सैन्य आणविले. ते राजे पल्लीवनास जातांच इतःपर आपणावरीं युद्धास न येतील असें समजून सर्वत्रास निरोप देवून पाठविले ते इतःपर येवू सकनार असें अपले मित्रासी तजवीज करून कित्येक सैन्यासमवेत पळून गेला. तेंव्हां राजे वाट कठिणशा रानांत येऊन राजा पळालासें वर्तमान ऐकून विरस होऊन शृंगारपुरहीं घेऊन तेथील लोकांस भरवसा देवून अनेक प्रबळसी प्रजा सकल जातीचे सकल कामाचेंहीं वसवून, त्रयंबकभास्करयांस प्रभावळीचें राज्य देऊन इतक्यांत ग्रीष्म कालहीं आल्याकरितां शिवाजीमहाराज अनेक शीतोपचार अनुभवीत बहुत संतोषाने शृंगारपुरी वास करिते जाहले. तदनंतरें परतून पनाळास येऊन पनाळ स्वाधीन करून घेऊन तसेंच दक्षिणप्रांती बेंगळूरासहित व चंदीप्रांतहीं सन् १६७७ इसवीस घेवून व त्या चंदीराज्या खालील प्रवल बंदर पुरचे रीत फराशीस होते. त्यास सन् १६८० इसवींत करारमदाराची टीटी करून देवून तेथून आणखी कित्येकराज्य स्वाधीन करून घेवून तेथून पूनाप्रांतास जावून चिल्लर कोठेकांहीं पांगळाचा मनुष्य होता त्याकोंणास मारणें, शरण आल्यां सोडणें अपेक्षिले त्यासी चांकरींत ठेविणे, येणेंप्रमाणें तेथील ठाणी समग्र बंदोबस्ती करून तदनंतरें चक्रावती संग्रामदुर्गासहीं ठाणी ठेवून येकंदर निःशल्य करून पूणेप्रांतास येवून राहिले. त्यानंतरें दिल्लींद्र अल्लीयदिल्शाहा उभयतानी शिवाजीराजाचे वर्णना केली जेः— राजा स्वतेव शूर, भाला, बर्ची, तरवार वगैरे सकला युद्धांचे हातहीं राजास चांगलें कळताहेत. भाल काठीचे आयुधहीं नूतन येक कल्पविलें. दुसरे आपण श्रीमंत होऊन दरयेक कामें आंगें कडून प्रयासाचेंहीं करणें याखेरीज सकल जनरंजक अतिशय बुद्धिवंत धैर्यवंतहीं राज्यकरणाराची अंगें साम, दान, भेद, दंड, हीचारी प्रयत्नेहीं समय

जाणून करणारे आणि जे साधारणेंकहून कैशा प्रबल कार्यातेंहीं अतिश्रमें कडून कार्य जाणूनहीं आणि करणारहीं व परम नीतिवंतहीं आणि दया‹ वंतहीं शरणागत संरक्षणहीं नीट करितो. रूपौदार्य गुणेंकडूनहीं पूर्ण आहे. या इतुक्या गुणेंकहूनहीं वरिष्ट आहे. ते मात्र नव्हें. ईश्वर वरप्रसादहीं येणेकडून भलत्याठायीं अनेक निधी सांपडताती. शत्रूच्या लाखो फौजा मध्ये राजाकडील सैनीक स्वल्प जन जेथून हरहर महादेव ह्मणून शब्दकरून येऊन पडतांच परसैन्य समग्र वाताहत होऊन जातें. ऐशा राजास जिंतणें असाध्य बरें, स्नेहानें आप्तहोऊं ह्मणालियां तेणेंकडून आपल्यास लाधवहीं आहे. दुसरें तेंव्हां प्रयासकरिता या राजाचे वाटे जाऊन रणें करून आपला फौजेचा व द्रव्याचा नाश न करितां उगाच आपुले ठांयीं असणे बरें ह्मणून अलीयदिलशाहा व अवरंगजेबहीं आपले ठांयीं स्वस्थ राहिले. तेंव्हां दिल्लेश्वर ऐशे अवरंगजेबानी फौज सन्नद्दाकरून शिवाजीराजावरी अपणच युद्धासजाणें ह्मणून निघाल्या समयीं आपले फौज समग्र शिवाजीराजाचे पराक्रमें भयें कडून मग्न आहेत. ही पाहून मनी कांहीं खिन्नशा व आपल्या फौजेवरी रागहीं धरून चालेकरून जातेवेळेस येक्याप्रदेशी नदींत आपण वसल्या खांस घोड्यास आपणच अनालस करून पाणी पाजविले. तेंव्हा तो घोडा एकदम्म पाणीपीवून परतून दुसरेंदा पिणेस तोंडपाण्यासमीप नेतेसमयीं उसळून पाण्यास आलीकडे कांठावरी येऊन परतून पाण्याकडे पाहिनासे झाला. तेंव्हां बाच्छाई वरी होते. त्यानी सांभाळून बसून आपल्या घोड्यास पाहून येथेंहीं शिवाजी आलाकाय कां घाबरा झालास ह्मणून फौजेकडें पाहिले. तरी त्याफौजेचे चित्तहीं व्यग्र-जाणन तेथेंच मोकाम करून शिवाजी राजास जीतधरून पहावें ह्मणून अनेकप्रयासें केले परंतू साध्य जाहले नाहीं करितां त्यांचा सुरत तरी लिहून आणून पाहावी ह्मणून योग्य ऐशा चित्ता-यास पाठविले. अपण तेथून कूचकरून मुरडून स्वस्तळास पावले. त्या चित्ता-याने येऊन बहुतदिवस

समय पाहिला परंतु राजाची रीत, देश, सांपडण्याचे आयासाकरितां राहिल्या स्थळी राहणे नाहीं. येका देशावरी जाताहेत ह्मणून राखून असते वेळेस पलीकडे एक प्रदेशीं वीसगावें, तीसगावें, भोई वरी आहेत ह्मणून ऐकणें. तेथें जाऊन पावतोरी आणखी कोठेंकीं वर्तमान कळणें नाहीं अशांत शिवाजीराजानी अमुकादेश बांधिला, अमुके राज्य बांधिले, अमुकी क्षणी ठेविले, पलीकडे अमुक्यां राज्यावरी चाली केले ऐसें ऐकणे मात्र परंतु राजे दृष्टिपथास येईनात. ऐसे अनेक दिवस फिरत असतां येक्या दिवशी मोदिमेचे वेळेस यां व खळक अनेक पुढे ओढणे. निखळ स्वार मात्र तीनिलक्ष स्वार जमाव निशीसी शिवाजीराजे राज्य-साधण्याचे कार्योद्देशेंकडून त्वरेने जाणार अशास त्या चित्ता-यानें पाहिलें, तेंव्हांचा अवसर शिवाजीराजे भल्या घोड्यावरी स्वारहोऊन शिरीं मुंडास. माजांत माजचोळना, जोडे, छत्री, पासोट्याची पंचगीं, बाछण, हातीचा भाला, खांद्यावरी ठेवून मस्तकाने दाबून घेऊन जोधळ्याचे शेतांत जाणार हाती जोंधळ्याचे कणीस घेऊन दोन हाताने ते कणस चोळून फकरामारून त्याचा भुलटा घोड्यांचे तोंडांत देतहोते. तैशा अवसरांत चित्ता-यानें पाहून त्याचरीति सुरत लिहून नेवून औरंगजेबापासी दिल्हा. ते पाहून आश्चर्यमानिले जे— शिवाजीराजा नीतीने लक्ष स्वाराचा सरदार श्रीमंत तसा राजा कार्य साधणेच्या तात्पर्यास्तव येकेठांयीं उतरून न्याहरीकरावयाचा किळबनांत कार्यनासून जाईल ह्मणूनहीं जवळील सरदार आपल्या मनो-गतानुसार कार्यकरणेस खोळंबतील ह्मणूनहीं जोधळ्याचे कणसचोळून खावून त्याचा भुलटा घोड्यासहीं चारिणा-या राजाचाहुशार आणी प्रयासीराजा साजणार. कोणत्या विषयीं प्रयास करिणे व्यर्थ ह्मणून दृढमानून स्वस्त-राहिले. हा राजा अनेक राज्य साधून अनेकद्रव्य संपादून ईश्वर प्रसादें-कडून अनेक निधिलाधून अमितद्रव्य जमा जाहल्यावरी आपला नाम्ना अणखी कोणत्यारीतीने प्रख्याती असावी ह्मणून योग्य डोंगर पाहिल्याठायीं

येकंदर गड बांधवणेस आरंभून मुख्य शिवगड व मंडन गड ऐशे तीनशे साठी गड बांधिले. तदनंतरे शिवाजीराजानी आपले ज्येष्ठबंधू संभाजीराजांचेपुत्र उमाजीराजे व संभाजीराजाच्या स्त्रिया जयंतीबाई एक, गौरीबाई एक, पार्वतीबाई एक, यातीधीमातोश्री बाई साहेब समवेत उमाजीराजे व त्यांचीस्त्री सौ० सकूबाई साहेब यांस समग्र राजपुर ह्मणावयाच्या राज्यांत ठेविले. तदुपरि कित्येक दिवसानंतरें उमाजीराजास सकूबाईपासून परसोजीराजे जन्म पावले. तदनंतरें शिवाजीराजास वडील सावत्र मातोश्री तुकबाई आवूसाहेब यांचे उदरी जन्मपावले येकोजीमाहाराज यांस पेसजी शाहाजीराजानी येकोजीराजें वडील संतती करितां कुलदैवत व अपली पहिलीलें बिरुदें व अल्लीयदिल्शाहानी सदर बकशीस केले तेव्हां प्राप्तजाहलीं बिरुदें दिलें. होतें ते येकंदर बिरुदें देऊन व घोड्यावरील अंबारीहीं येकदेऊन त्याच्या स्त्रियास उंगदीपाबाई आवूसाहेब आदिकरून सौग मातोश्री सई बाई एक, सौग मातोश्री अनुबाई एक, या त्रिवर्गांसहीं समागमें देऊन आपण आणखी कित्येक स्वारबार सन्नाह देऊन बेंगळूर राज्यास पाठविले. त्यानी बेंगळूरींच राज्य करीत असतां शक १५९३ परीधावी संवत्सरीं एकोजीराजे यांचे उदरीं सौग दीपाबाईसाहेबापासून प्रथम पुत्र तिसरे शाहजीराजे जन्मपावले. त्या संधींत अल्लीयदिल्शाहानी तजवीज केली जे शिवाजीराजे प्रबळ होऊन राज्यसमग्र आटोपिले. त्यांस खाली करावें ह्मणून व अवरंगजब बाच्छायानीहीं उदंडदा युद्ध करून उदंड प्रयत्ने केल्यासहीं आटोपनासें गेले. आतां एकोजीराजे त्यांचे सावत्रभावू व बेंगळूरी पावले आहेत करितां त्यांसी संविधान करून आपलें करून घेऊन दक्षिणप्रांतावरी तरी आपली सत्ता चालिल्लेसें करावी. नाहींतरीं शिवाजीराजे यांस बळेंबांधून तेहीं आक्रमितील. आतांच आह्मी येकोजीराजास आपले केल्यानें शिवाजीराजेहीं आपले भावू स्वकर ह्मणून त्यावाटे जाईनात ह्मणून तजवीज करून येकोजीराजास तुमचे वडील शाहजीराजे अमच्या अनुमतीवरी जैसें होतेकीं तैसेंच तुह्मी असावें

ह्मणून उदंडरीतीने संविधान पाठविले. त्यास त्या येकोजीराजानी तजवीज करून युक्तमानून अल्लीयदिल्शहाची गोष्टमानून अनुसरले. येकोजीराजे बेंगळूरी राज्यभार करीत असताना तंजावूर राज्य करणार नायडकूटानी त्रिचनापल्लींत राज्य करणार नायडकूटासीं बिगाड पडून तिरचनापल्लीचे नायड बलवंत झाल्याकरितां त्यांकडून आपलेराज्य अपहृत होईल ह्मणून दृढमानून त्या त्रिचनापल्लीच्यानी तंजाउरच्या किल्यावरी युद्ध करीत असतां निर्वाहनाहींसें विजापुरास अल्लीयदिल्शाहा बाच्छाईकडें हेजिबास पाठविले. त्याने जाऊन खादार एक, खलासखान व अबदल्हलीम या दोघेवजीरांस अनसरून त्यांच्या गुजराताने बाच्छायाची भेटी घेवून आपुले यजमानाचा हवाल जाणविले. तेंव्हां अल्लीयदिल्शाहानी या खादारएक खलास व अबदुळ्हलीमासच कुमुकेस जा ह्मणालें. त्यानि अपली फौजच पुरना अणखी कुमकपाहिजे ह्मणाल्याकरितां एकोजीराजे बेंगळूरी होते त्यांस दस्तक देऊन त्यांसहीं बरोबरी घेऊन जाह्मणाले. तैसेंच तें उभयतां वजीर बेंगळूरास येऊन एकोजीराजाची भेटीघेऊन दस्तकदिल्हे. राजानी ते दस्तक मानून या उभयतां बजीराशी घेऊन तंजाउरचे वकीलहीं येकोजीराजास कुमुकेस्तव प्रार्थना केले. तेंव्हां येकोजीराजे सकळ सन्नाहानिशी कुमकेस येताना वाटेस आरणीचे राज्य साधून वेदाजीभास्कर यास आरणीचे किल्यांत ठेऊन तंजाउरास येऊन त्रिचनापल्लीच्यांसी युद्धकरून त्यासीं पळवून तंजावुरच्यास मोकळीक करून आपण बेंगळूरास प्रयाण होउन तिरुमलवाडींत राहिले. तेंव्हां त्यांची स्त्री दीपाबाईसाहेब पूर्णगर्भिणी समागमें होते. येकोजीराजे तिरमलवाडीस उतरलें तेंव्हां दीपाबाई साहेबास प्रसवकाल होऊन येकोजीराजास द्वितीय पुत्र शक १५९६ राक्षस संवत्सरीं तिसरे शरफोजीराजे जन्मले. तेंव्हां येकोजीराजास स्वप्नांत देवानी येऊन सांगीतले जें "तुह्मी तंजावरचें राज्य सोडून जावूनका. तुमचे वंश परंपरेने हे राज्य भोगावें यास कारण आहे. उद्या पाहाटे तुह्मास संविधांन येईल" ह्मणून सांगीतले.

तैसेंच दुसऱ्यादिवसीं तंजावरांतून योग्या योग्य चर्चामुळें येकास येक भेदपडून अमात्यपण करणारहीं बिगडून तिरमल्वाडींत होतेत्या येकोजीराजांस तुह्मी हे राज्यपरिपालन करावें ह्मणून प्रार्थिले. ईश्वर संकल्प टळतांनये ह्मणून अंगीकार करून येकोजीराजे तंजावर किल्ला प्रवेश केले हे पूर्वोत्तर पुढें विस्तारें कडून तंजावूरप्रांती या राजवंशाचे राजे राहिले. ते प्रकर्णे लिहिण्यांत लिहिलेजाते. पुनाप्रांती सकल दिग्विजय करून राहिले शिवाजीराजे यांस अष्टनायिकांची नांवें सांग सईबाई लिंबाळकराची १, दुसरी काशीबाई जाधवाची १, तिसरी सखवारबाई गायकवाडाची १, चवथी पुतळाबाई पालकराची १, पांचवी सगुणाबाई शिरक्यांची १, साहवी सोयरीबाई मोहित्याची १, सातवी मालव्होची लेंके १, आठवी विचान्याची लेंके १, या अष्ट नाइका समवेत शिवाजीराजे सुखें भोगीत असतां वडील सईबाईच्या पोटीं तीघीकन्या व येकपुत्र जन्मले. त्यांचें नाम संभाजीराजे ह्मणून ठेविले. त्या संभाजीराजाचे जननशक १५९८ पिंगळसंवत्सर; तीघी कन्यापैकी प्रथम कन्या सखवारबाईस लिंबाळकराचे घरी दिल्हे. दुसरी कन्या राणूबाई जाधवाच्या घरी दिल्हे. तिसरी कन्या अमणिकाबाई महडीकाचे घरीं दिल्हे. त्या हरजी महडीकासच चंदी प्रांती कित्त्येक जाहगीरहीं दिल्हें. दुसरीस्त्री काशीबाईसाहेबास संततीच नाहीं. तिसरी स्त्री सखवार बाईसाहेबास कपलाबाई ह्मणून येक कन्या ते पालकर नेतोजीस दिल्हे. चौथी पुतळाबईस संतती नाहीं. पांचवी सगुणाबाईस राजकुमरीबाई ह्मणून कन्या जाहली. ते गणोजी शिरके यांस दिल्हे. साहवी सोयिरीबाईस येकपुत्र जन्मले. त्यांस राजारामराजे ह्मणून नांवें ठेविले. दुसरी कन्या दादूबाई. तदनंतरें शिवाजीराजेयानी आपुले दोघेपुत्र संभाजीराजे ज्येष्टास शके १६०२ दुंदुभीसंवत्सरीं आपले स्वराज्य पुणें प्रांताचे तक्त देऊन धाकटेपुत्र राजारामास प्रथम चंदीचेराज्य दिले होते. सेवेंच महत्कलापें कडून पुणेप्रांत संमग्र यवनाक्रांत झाल्यावेळेस राजाराम चंदीहून निघून

तंजावूराचे किल्यांतहीं थोडे दिवस भावापासी असून उपरी शिवाजीराजानी बलावून पाठविलें. तेव्हां बापापासी पावले होते त्यांस पनाळगड देऊन आपण शेतूयात्रेनिमित्त गुप्त मार्गेकडून येऊन यात्रा शिद्धी करून त्यांत येकिता अगोदरी येकोजीराजे तक्ती बसतांच राजे गुप्तमार्गे तंजाउरचा किल्यांत येऊन किल्ला फिरून पाहून बाहेर जाऊन येकोजी राजास सांगून पाठविले जे–" तुह्मी संपादिले राज्यसमग्र आह्मी पाहिले. तुमचा किल्ला गरुडाद्रि आहे. थोर किल्यास चारीबाजूस किल्ले आहेत परंतु पुढें राखणें कठिण पडेल याकरितां दक्षिणेकडील उपकिल्लामात्र पाण्याच्या आजपास आहे. तेवढा किल्ला राखून वरकड पाडून सोडणें. आह्मी किल्यांत आलों. तेंव्हां येका दुकानांत अमचा शिखा टाकून शिरणी घेतली तो शिखा पाठवणे " ह्मणून त्या दुकानची खूणहीं सांगून पाठविले. तेणेप्रमाणेंच तंजावुरी असणार राजानी विकिले होते. तदनंतर येक किता शेतूयात्राहीं करून स्वस्तलासी पावले. तदुपरि शिवाजीराजे दोघे पुत्रास राज्यनेमून सकल पृथ्वींतहीं प्रख्यात नामपावून सकल शत्रूसहीं पराजय पाववून निःशल्य जाहल्यावरी जन्मघेतल्यास कृतकृत्यता काहीं जाहले ह्मणून प्रपंच वराज्यपक्ष्वीचा परित्याग न करितां बारमार्थिक निवृत्ती मार्गाचेठांई मन प्रेरूञ्ज तोच दृढाभ्यास धरून श्रीगुरुवाक्याचें मनने कडून निजध्यासहीं जाहल्या दशांत पर्यातीचे दिवस ढकलून शाश्वतऐशा स्वपदास अनंदरूप होऊन पावले. त्याउपरी संभाजीराजे पितृकीर्तीस विस्तारवीत राज्य परिपालन करीत असतां दिल्लीश्वरऐशा औरंगजबानी सार्वक्रमेकडून बावन्न बाळइताहीं साधून, सार्वभौमनामें पाऊन, सकलदेशाचे देशाधिपतीस भेटीस बलाऊन पाठविले. तेंव्हां अखंभाबाद ह्मणावयाचें स्थल अवरंगजबाकडून निर्गिजेले त्या स्थलास सकल देशांचे राजां बरोबरी संभाजीराजेहीं जावूनहीं पावले. तेंव्हां सर्वत्रानी बाच्छायाचे भेटीस गेले. तेंव्हां लवून सकळहीं खुरनिशी केले. तैशें संभाहीराजे

खुरनिशी न करितां उभेराहिले. त्या वरून पादशाहास रागयेऊन संभाजी राजास कैद करविले. त्याचे कैदेंत साहा चार महिने असून, शिरनीचे पेठा-यांत बसून बाहेरी येऊन, आपल्या राज्यास पावून राज्यकरीत होते. ते कैदेंतून चुकले ह्मणायाचे अपरंगजेबास कळून सैन्यपाठवून संभाजी राजास धरून आणा ह्मणून निरोपिले. ते फौज राजावरी युद्धास आली. तेंव्हां संभाजी राजानी युद्ध करून आली सेना व सेनानायकास हतकरून पळविले. हत शेषानी जावून बाच्छयास जाणविल्यावरी परतून बाच्छायानी भूराशी सनातोसच सेनानायक वजीरासहीं पाठविले. त्यानी येऊन संभाजीराजासी कांहीं युद्ध कांहीं कृत्रिम येकीकडून करून संभाजीराजास धरून नेऊन बाच्छायापासी सोडिले. बाच्छायानी संभाजीराजास पाहून लवून खुरनिशी करा सोडितों ह्मणाले. तेंव्हां संभाजीराजानी आतां आह्मी तुमच्या हातीं सांपडल्या सारिखे तुह्मी सांपडते तरी कळोयेते ह्मणांले. अवरंगजेबास रागयेऊन पुन्हाहीं कैदेंत ठेविले. थोडे दिवस गेल्यावरी संभाजीराजानी लवावें ह्मणून येकीकडें लहान दरवाजा करून संभाजीराजास त्या वाटेन भेटीस बलाविले. तेंव्हां राजेमजकूर पुढेंपांय सोडून आले. ते पाहून बाच्छायानी संतोष मानून हा केवल शूर आहे याला मारूनये ह्मणून तुह्मी तुरूक व्हा तुह्मास सोडून देंतों ह्मणाले. तेंव्हां संभाजीराजानी तुमची लेंक कन्या आहे तिला द्या तुरुक होतों ह्मणाले. तों शब्द कठोर वाटून बाच्छायनी मारून टाकणेस हुकुम दिल्हे. तेणे प्रमाणे मारून टाकिले. तेंव्हां शक १६१८ ईश्वर संवत्सरीं वर्तमान बाच्छायाची लेंक उपवर होती. तिला कळून येवढा थोर बरोबरीचा राजा भंय वरीनासें माझी अपेक्षा धरून जीवानिशी गेले. मी तशा शूराचीच स्त्री; त्या वेंघळा पुरुषमात्र माझा पुत्र अथवा पिता भ्राता ह्मणून निश्चय करून यवन सांप्रदाया प्रमाणे दाक्षणी लाविली. तुरुकांतील संकेत कन्यापणी दाक्षणा लावणें नाहीं, लग्न जाहल्या उपरी लावणे करिती. लेंकीनें दाक्षणा लाविलें वर्तमान बाछाईस कळून

लेंकीस पाहून हे काय केलीस ह्मणून विचारिल्यास म्या केलेते उत्तमच केलें; परंतू तुह्मी दोनी गोष्टीचे स्मरण धरिले नाहीत काय ह्मणिजे तुह्मा सारिख्याच्या पोटी जन्म जाहल्या उपरि मला तुह्मी तुह्माखालील येकासच द्यावें संभाजीराजातैसा नव्हें. तुह्मासो बरोबरीचा दावा राखून तुह्मास सलाम करीना ह्मणल्यां योगें शौर्य राखिला. तो या खेरीज बहुत देशाधिपति राजे अशाने माझी आशाधरून मागीतल्यावरी यापेक्षा अधीक कोणास तुह्मी पाहिलां आहां. याखेरीज अमच्या मतामध्ये तुरूक होतों ह्मणून कबूल जाहल्याहीं त्याने न मावण्याचे मागीतल्याहीं देवूनच त्याला तुरूक करिणे हा माप जाहल्याकरितां उभय पक्षीहीं चुकलें. या उपरी म्यातरी भलत्या येकास लग्न करून घेऊन कितीदिवस वांचणें आहे. मुख्य कीर्तीच राखावी यास्तव जे मजवरी मोहून जीवास उदार जाहलेकीं त्यांकरितां रांडपण भोगणेच मजला स्वधर्म परंतु संभाजीराजाविना यितरपुरुषासि संभाषण आपल्यास व्यभिचार ह्मणून मानिलें ह्मणून साफ सांगीतल्या वरून बाच्छायी व्यसनस्थ होवून ईश्वर आपल्या पोटी तीघे लेंकाचे पाटीसी येक कन्यादिल्ही; तिचा संसार निस्सार जाहला. याखेरीज तिने दोन कारणें सांगून आपला निश्चयहीं सांगीतला. ते प्रपंच परमार्थास युक्त बोलणें बोलिली. परंतु आपल्यास क्रोधाने वंचिल्या करितां, क्षमें येवढें थोर नाही ह्मणून ग्रंथांतर बोलताती. ते खरच ह्मणून आपल्या जिव्हारी खोंचून या उपरी त्या लेंकराच्या मनास कोणे रीती सौख्य देऊन पाहतों ह्मणावयाच्या व्यसनानें संभाजीराजाचे भाग्यास योग्य अधिपती कोण्ही आहे काय परामर्ष करून असेल त्यास आणून सोडा ह्मणून आज्ञापिले. त्या वरून सातार पुनें प्रांती बाच्छायाकडील्यानी विचारणा करूं लागले. तेंव्हां संभाजीराजास धरून नेते वेळेस त्याचे उदरी गुणरत्न ऐसे कुलदीपक शाहूराजे शक १६१५ भवा संवत्सरीं जन्मपावून तीन वर्षांचे होते. परंतु त्याचा लाग लावुंदेयीनासें तदीयानी बाच्छायाचे भयास्तव दबविले. त्यास परतून बाच्छायाकडून

प्रमाणपूर्वक अभय पावल्या करितां येतद्विषयींचे शोधणेस आले होते, ते कार्यस्थासमागमें लेंकराच्या पक्षपात्यानी शाहूराजे लेंकरास घेऊन दिल्लीस पावून औरंगजेब बाच्छायापासी सोडिले. तेंव्हां बाच्छायानी हर्ष व खेद येक कालींच पावून शाहूराजास आपल्याचे कडेवरी घेऊन, लेंकीचे महालास जावून, माये तुझे लेंकास घे ह्मणून हाती दिल्हें. तेंव्हां त्या बेगमास परम संतोष होऊन आपल्या सर्व सौख्याचे कारण हेच लेंकरू ह्मणावयाचा निश्चय मानून, त्या लेंकरास त्याच्या हिंदूधर्मास तिळप्रमाणेंहीं हानी न येतां सर्व विध संरक्षणा सरिसें विद्याभ्यासहीं कराविले. शाहूराजास चंद्रवृद्धीसारिखें विद्या भ्यास परिपूर्तीस बारावर्षे वयहीं जाहलें. तेंव्हां त्या बेगमाने आपल्यां लेंकाचें रूप आणि वय व विद्या व सौजन्यता इत्यादि योग्य ऐशी सर्व उपपत्तीहीं पाहून त्याचे लग्नाचे हव्यासास मनें प्रवर्तुन बाच्छायास विनाविलें. तेंव्हां बाच्छायानी यथायोग्य लग्नाचे खर्चासहीं देऊन त्याचे लग्नहीं करवून नवरा नवरी दोघासहीं घेऊन या ह्मणून निरोपिले. तदनुसारच शाहूराजास जाधवाची कन्या सखवारबाईस लग्न करून दिल्यावरी नवरा नवरीस बाच्छायापासी पांठविते वेळेस सोइरे वगैऱ्यानी उदंड बाचठाई जाहलेतरीहीं यवन जातीची शंका धरून त्या सखवारबाई साहेबांस न पाठवितां त्या स्थानास वीरू ह्मणूणारी दासीस निष्कर्ष कडून पाठविले, तेंव्हा बाच्छायानी उभयतां नवरा नवरीस दोंनी मांड्यावरी बसवून पाहते वेळेस नवरी-चेठाई कृत्रिमता भासूनहीं आपल्या मांडीवरी बसविल्या करितां हे बाइकोच या शाहराजांचे सकल भाग्यहीं अनुभवील ह्मणून उभयताच्या मस्तकास हस्तस्पर्श करूम उभयतांस सकळ आभरण भूषित करून शाहूराजाचे पितृ-पितामहानी संपादिले राज्यसमग्रहीं राजे मजकूरास सोडून त्याचें स्वस्थानास निरोप देते समयी, बेंगमाने विनविले जे शाहूचे बाईस दिल्हे परंतु माझें कांहींच माझा ल्योंक शाहूस पावलेनाही ह्मणाली. ते बाच्छायानी ऐकून बिहितच माइऱ्या भाग्यास माझे तीघे लेंक जैसें विभागी कीं तैसीच चौथी

कन्या करितां इचाभाग चौथा तीच्या लेंकास पावावा ह्मणून जेथे जेथें बाच्छयाची आमदानी असेल तेथे समग्रही शाहूराजाची चौथाई ह्मणून चौथाईचे प्रमाण करून देवून शाहूराजास पूनेप्रांतास पाठविलें शाहूराजे सातारास येऊन शकें १६२६ पार्थिव संवत्सरी तक्तीं बसले. तदनंतरें शाहू महाराजानी आपले दाइजा पैकी येक मूल रघोजी ह्मणणारास पोषीत होते. त्या उपरी येके दिवसी स्वारीस गेल्या ठायीं येक लेंकरू फार संदर खेळत होतें. त्याला पाहून पालखींत घेऊन वाड्यास येऊन परामर्ष केल्या ठायीं लोखंडे ह्मणून राजाचे आप्तकीचे कोणी होते; त्यांचे लेंकरू ह्मणून कळून, त्या लेंकरास पोसून फतेशिंग ह्मणून नाव ठेऊन, त्याचे नांवें भारी दौलतहीं करून, योग्य अशाची मूले त्या फतेशिंगास लग्नकरून देऊन, त्यास अक्कळ कोटकिल्ला व त्या खालील राज्यहीं फत्तेशिंगास दिल्हें. तैसेंच रघोजी भोंसल्यास वीरूबायीचे ओंठीस घालून त्याचे लग्नकरून त्याला वीरूबाईचे ओंटी घातल्याहुळें उणीव बोलाचे ठाव झाल्या करितां त्या रघोजी भोंसल्यास स्वराज्यांत न ठेवितां योग्यतेच्या मानास उणें झाल्याकरितां नागपुरचें राज्य दिल्हे. तदनंतरें आणखी आपले दायीजा पैकीं पेसजीवंश लिहिल्यात तेरा पुरुष बाबाजीराजे ह्मणून लिहिलें आहे. त्यांचे पुत्र मालोजीराजे व विठोजीराजे ह्मणून ऐशे माघे लिहिलें आहेत. या खाले त्या विठोजीराजास आठ पुत्र जाहले ह्मणून निजामशहाचे वेळेस त्या आठभावापैकी येकदोघाची ख्याती लिहिली आहे. त्या आठभावापैकी मालोजीराजे, ह्मणणाराचे लेंक माणकोजीराजे त्यांचे लेंक विगेजीराजे. त्याचे लेंक परसोजीराजे, त्यास दोघे पुत्र, ज्येष्ट संभाजीः दुसरे रामराजे. त्या रामराजास शाहूराजानी ठेऊन घेऊन पोषींत होते. तदनंतरें कित्तेक दिवसा वरी शाहूराजास केवळ उपद्रव झाला. तेंव्हा शाहूराजानी पून्यांतून पेशव्यास बालावून पाठवून तुह्मी कोणत्या रीतीहीं आमचे नांवें राखा ह्मणून सांगून परमपदास पावले. उपरी राजानी पोसिलेते रामराजास शकें १६७४

श्रीमुख संवत्सरीं तक्तीं बसविले. त्यानी कित्येक दिवस राज्य अनुभवून निर्याण समयीं त्यांचे विठोजीराजाचे आठपुत्रांपैकीं खेळोजीराजाचे नातू उमाजीराजा ह्मणून वागत असणार त्यांचे लेंक शाहूराजास रामराजे देवगतीस पावल्यानंतरें शके १६९५ जयासंवत्सरीं साताराचे तक्तीं बसविले. आतां तेच राजे होऊन आहेत. शिवाजीराजाचे दुसरे पुत्र राजारामास पनाळ्याचे राज्य दिले होते. त्यानी देह ठेविल्यावरी त्यांचे कुलदीपक औरसपुत्र संभाजीराजे ह्मणणार राज्यकरीत होते. त्यांस संतती नाही. त्यानी निवर्तते वेळेस आपले दायिजापैकी येक मूल घेऊन त्यास शिवाजीराजे ह्मणून नावे ठेऊन त्यास पनाळ्याचे तक्त देऊन संभाजीराजे निवर्तले. पेसजी ते शिवाजीराजेच राज्य करीताहेत आतां येकोजीराजेयानी तंजावुर साधिले. त्याच्या वंश विस्तारातें लिहितों जे--भोंसलवंशात येकोजीराजे ह्मणून नाव पावले. चौथे येकोजीराजे दुसरेंदा बेंगळूरी राज्यकरीत असतां विजापुरचे बादशाहा अलीयदिलशाहासीं पत्रें आली. त्यांत तंजावूरचे राजे विजयराघव नायड वगैरयावरी त्रिचनापल्लीचे राजे नायडानी मोहिम् करून किल्ला वेढिला आहे ह्मणून तंजावुरचे राजानी वकीलास पाठविले करितां खादर १, खलासखाम् व अट्दुल्हलीम यावुभयतां वजीरांस थोडी फौज देऊन पाठविलों आहे तरीं तुह्मी आपले फौजेनिशी यां बरोबरी जावून त्रिचनापल्लीचे नायडाची फौज मारून काहडून तंजाउरच्यांस मोकळें करून बादशाही प्रेषकषी व त्यावरी बाकी आहेते वाहाल फौजेचे तालबंदी मोकरोर पावली तेंहीं त्याकडून घेऊन पांठवणें ह्मणून लिहिला अर्थ मानून राजेमजकूर बेंगळूरचा किल्ला व राज्यहीं कागलकर घाटे जुझाखा याचे स्वाधीन करून उभयतां वजीरां बरोबरी स्वार होऊन येतेवेळेस आरणीचे राज्य साधून तेथून तंजावर प्रांतास येऊन त्रिचनापल्लीच्या नायडाचे फौज मारून काहडून तंजावुरच्यास मोकळें करून प्रेषकषी व तालबंदीचे पैक्यास्तव आपण तिरुमलवाडींत उतरून बरोबरी आले दोघे वजीर खादर येक, व खलासखान व अबुदुल् हलीम् उभयतांस पैक्यास

सक्ती करण्यास्तव किल्या बाहेरच राहते करून राजे मजकूर दुसरे पुत्र शरफोजीराजाचा जन्मकालयामजाहल्याकरितां तिरुमलवाडींत राहिले होते. तेव्हां शके १५९६ राक्षस संवत्सरीं वंशांतील शरफोजीराजे ह्मणून नाव पावले. त्यांते तिसरे शरफोजीराजे जन्मले. याचा अर्थ वरि लिहिला आहेकीं त्याउपरि तंजावुराचे राजे विजयराघवनायड वगै-यानी प्रेषकशी व तालबंदिचा ऐवज देण्यास लबाडी करून येकांत येक योग्य अयोग्यतेचे चर्चा पडून विजापुरास पाठविल्या वकीलाचे निराकरणें करून किल्या बाहेरील दोघे वजीरासहीं दगा करावें याची योचना करून दूसरा किता न पावल्या करितां बादशाहीतें पैक्यास जमा न जाहलातो नायडाचे अमात्यपण करणार व वकीलहीं बिगडून कोटा बाहेरील उभयता वजीरांपासी येवून नायडकूट फार दुर्वृत्त जाहले चर्याहीं फार अमंगळ वर्ततात; राज्यही बुडविले, येकांत येक नाहीत, तयाच्याने राज्य सांभाळवतनाही करितां तुह्मी हे राज्य आक्रमावें; व्यर्थ येकांत येक भांडून पंधरा वीसजणास मारणार आहेत. आहेते फौज ह्या राजाचे वश वर्तत नाही. उद्या परव्हांत हल्ला करून राजास मारून लुटणार आहेत करितां तुह्मीच हे राज्य करावें ह्मणून सांगीतले. तेंव्हां ते खादर येक खलास व अबदलूहलीमू दोघे वजीरानी येक दोन दिवसाचे अभ्यंतरी राज्य शोध केल्याठायीं याउभयतानी सांगीतले ते येकंदर खरेंच; याहीं विना राज्यांतील फौजेचे सरदारहीं येऊन बोलूं लागले. तेंव्हां अशा त्या वकीलासहीं उभयतां वजीरानी सांगीतले जे—अह्मा कडूनच होणार नाहीं. येकोजीराजे तिरमलवाडींत आहेत त्यांस आह्मी पत्र लिहून देतों. तुह्मी उभयतां जावून त्यांस बलावून आणिल्यां कार्य साधेल ह्मणून पत्र लिहिले. ते घेऊन अशा वकीला उभयतानी तिरमलवाडीस येकोजीराजापासी येऊन पत्रहीं देऊन किल्यांतील राजाचा च फौजेचा व दायिजाचा विचारहीं जाणवून प्रार्थना केली. तेंव्हां येकोजीराजे जरूरी भांडली फौज मात्र घेऊन तंजावरास येऊन उभयतां वजीरासीहीं बोलून, समागमें घेऊन शकें

१५९६ राक्षस संवत्सर माघशुद्ध सप्तमीस तंजावुरचा किल्ला प्रवेश करून आले. ते किल्ल्याच्या उत्तरेचा दरवाज्याने आंत आले. त्याने आला तो दरवाजा करितां अल्ली दरवाजा ह्मणून नाव पडलें. तेथून समोर बिदीने दक्षिणेस कित्येक दूर आल्यावरी दिवाण वाड्यांतून राजे नायड व त्यांचे दायीज भाऊबंद थोडी फौजहीं घेऊन समोर आले. त्यानी हत्यार धरून भांडल्या करितां तंजावुरराज्य केलेते नायडांचे फौज वगै-यां पैकीं त्यांत आठजण ठार जाहले. वरकड वाताहत होऊन गेले. किल्ला फत्तेजाहलें त्याउपरी वरकड शल्य होतें तेहीं काहडून निःशल्य करून सर्वेच पूर्वेचे दर्वाज्यानें निघून बाहेर येऊन राजे उतरले. फत्तेकरून आल्या दरवाजास फत्तेदरवाजा ह्मणून नाव पडलें. तदनंतरें किल्ला तो मोकळा जाहला. पहिलें अमात्यपण करणारासच त्या वेळेस काम पाहणेस नेमून राजे व उभयतां वजीर बाहेर उत्तरल्यावरी येकोजीराजानी उभयतां वजीरांस बेंगळूरास जाणेस निरोप मागीतले. तेंव्हां उभयतां वजीरानी अमचा विवाद वारतोर असावें ह्मणून प्रार्थून हे राज्य मला तुला ह्मणून भांडू लागले. अशांत दोन महिने लोटून गेले. इतक्यांत अवरंगजब बाछायाची मोहीम होऊन तमाम बाछाईचा अवरंगजबाचे हस्तगत जाहला ह्मणावयाचे वर्तमान आले. विजापुरहीं भांडतेजाईलकी राहीलकी ह्मणून संशयांत पडून खादर येक, खलास व अवदुलइलीम उभयतां वजीरानी तजवीज केली जे— आह्मी दोघे भांडून येकतरी राहूं परंतु येकोजीराजे निघून जातील मग अमच्याने हा किल्ला सांभळवेना. त्रिचनापल्लीचे नायड बलवंत, दुसेंर अल्लीयदिलशाहाहीं अह्मास जिरूंदेयीनात करितां येकोजीराजे शूर आहेत त्रिचनापळीच्यासहीं दाटादेतील; दुसेरें त्यांचे भावू शिवाजीराजे त्या प्रांतीं प्रवलेंकडून आहेत करितां, अल्लीयदलशहाहीं यांजवरी कांहीं करणार नाहीत याकरितां राज्य येकोजीराजानीच करावें. त्यानी वंश परंपरेने अमची मर्यादा चालवावी. येणेप्रमाणे करावें ह्मणून निश्चय करून घेऊन येकोजी-

राजासही बोलून सम्मत करवून अपली मर्यादा वंशपरंपरेनें चालवावी ह्मणावयाची बोली राजाकडून घेऊन शकें १५९७ नळ संवत्सर चैत्रमासीं तंजावुर राज्याचे तक्तीं येकोजीराजास बैसविले. येकोजीराजास तंजावरचे राज्य प्राप्त होतांच महाराजानी विजापुरच्या अलीयदिल्शाहा बादशाहास योग्य ऐशी नजर देउन खादर येक खलास व अबदुलहलीम् उभयतां वजीरांस आपल्यापासीच राहून घेतल्या करितां, त्यांच्या न येण्या वरून बाछाई विमनस्क होईनासें युक्तीनें कागद पत्र लिहून पाठविले. ते पाहून अलीयदल्शहा फार संतोष मानून येकोजीमहाराजास वस्त्रें पाठविण्यासरिसें हे तंजावरचे राज्य येकोजी महाराजास त्यांचे वंश परंपरेने अनुभोगणेसहीं सानक दिल्हें. असे ह्मणून लिहून पाठविले. तदनंतरें त्रिचनापल्लिचे नायडानी येकोजीराजावरी राजकारण केल्यास राजे मजकूरानी युद्ध करून त्यांस दाटादेऊन त्यांकडून संदली महाल पानसुपारीस ह्मणून लिहून घेऊन खादर येक खलास व अबदुल्हलीम् उभयतांसहीं त्यांसी बोलिल्या मर्यादें प्रमाणे चालवीत राज्यकरूं लागले. उपरि शकें १५९८ पिंगळ संवत्सरी येकोजीराजास तिसरे पुत्र तुकोजीराजे जन्मले. हे तीघे पुत्रहीं येकोजीराजाची थोरली स्त्री इंगळ्याची लेंके दीपाबाईसाहेब यांचे उदरीं जन्मले. त्यांची धाकुठी स्त्री मोहित्याची लेंके अण्णूबाईसाहेब यांस येक लेंके या खेरीज त्यास परिगृहीत स्त्रिया नोवु. ह्यांत जन्मलेते चंद्रभान, सूर्यभान, मित्रभान, कलेभान, कीर्तिभान, विजयभान, उदयभान, ऐसे सातलेंक जन्मले पैकी जेष्ट चंद्रभान शूर जाहले. येकून येकोजीराजास पुत्र दहा. तदनंतरें कित्येक दिवस न्यायेकडून राज्य परिपालन करून शकें १६०४ रुधिरोद्गारि संवत्सरी येकोजीराजे यांसी परमपदवी प्राप्त जाहली. सेंवच ज्येष्ट पुत्र तिसरे शाहजीराजे तक्तनिशी जाहले त्या शाहजीराजास भार्या चिमाबाईसाहेब ह्मणणार येकच, परिगृहीत स्त्रिया उदंड होत्या त्या शाहजीराजानी धाकुट्या वयांत प्राप्त जाहलें राज्य

आपल्या बुद्धिवैभवेंकडून आपले धाकुटे भावू शरफोजीराजे व तुकोजीराजे उभयतांस व आपल्यासहीं यथाकाली लग्नमुहूर्तहीं करून आपुली मातोश्री दीपाबाई आऊसाहेब यांचे अनुमतीने सकल जनास सौख्य व्हावे याजोगे आपुली फौज व खजाना वाहडवून राज्य करीत येण्यांत मुल्लाय कलाप म्हणून एक कित्ता, यजुल्फकाराचा कलाप येक कित्ता, ऐसे कलाप आले तेंव्हां आपुल्या राज्यापावेतो येवुंदेयीनासें परभारेंच वारून विजापूरचे पादशाहासीहीं सलूक राखून, पेषकषीहीं येकमार्गे कडून वारून घेऊन, राज्यभार करीत असतां त्यांचे तिसरेभावू तुकोजीराजे यांस शकें १६१७ धातु संवत्सरीं पांचवे येकोजीराजे जन्मले. त्यांस प्रतिनाम बाबासाहेबराजे म्हणावयाची रूढीहीं पडली. तदनंतरें शाहजीराजे चांगल्या नीतीने बहूत दिवस राज्यभार करून शकें १६३३ नंदन संवत्सरीं परम पदास पावले. सवेंच त्यांचे दुसरेभावू तिसरे शरफोजीराजे तक्तनिशी जाहले. त्या शरफोजीराजास पहिली स्त्री घांटग्याची लेंकें सुलक्षणा बाईसाहेब, दुसरीस्त्री घांटग्याची लेंकें अपरूपबाईसाहेब, तिसरीस्त्री शिरक्याचीलेंके राजसबाईसाहेब यासमवेत राज्यभार करण्यांत न्यायास न सोडितां परम नीतीनें राज्यभार करित्या दिवसांत अवरंगजिबानी विजापुरचे अल्लीयदिल्शाहास दस्तगीर केल्यामुळें त्या संधांत उद्भवल्या कलापाचा धक्का आपल्या राज्यास लागूं देईनासें विजापुरांतून उघडून आल्या माखराचा आदर करून राज्य भारकरीत असतां, त्यांचे धाकुटे भावू तुकोजीराजानी लग्नकेले स्त्रिया—अरणाबाई मोहित्याची एक, रामकुमारबाई इंगळ्याची एक, मोहिना बाई पिंगळ्याची एक मनाबाई पिंगळ्याची येक, लक्ष्मुंबाई इंगळ्याची एक, एकून लग्नाच्या स्त्रिया पाच. याखेरीज, राख्या सहा पैकी एकमात्र म्हराठ्या जातीची वरकड पांचहीं नायडकूटाच्या. त्या म्हराठ्याचे जातीची तरवारीस लग्न केलें ते राखे अन्नपूर्णाबाईचे पोटी शकें १६६४ शार्वरी संवत्सरी प्रतापसिंहराजे जन्मले. सवेंच शामाबाई म्हणून येक कन्या जाहली. वरकड नायंडकूटाच्या राख्या पांचापैकी जाहली संतती मालोजी-

राजे येक, अण्णा साहेबराजे येक त्यांस दुसरे नांव हरिश्चंद्रराजे, नानासाहेब-राजे येक, कन्या दोघी येणेप्रमाणे जन्मले. त्याउपरि शरफोजीराजाचे राज्यांतच त्यांचे धाकुटे भाउ तुकोजीराजाचे लग्न केले स्त्रीचे पुत्र पांचवे येकोजीराजे प्रतिनाव बावासाहेब ह्मणून वरीलिहिले आहे त्यांस लग्नकेल्या स्त्रिया—पहिली सुजानबाई इंगल्याची लेंक येक, दुसरीबाइको जयंतीबाई-साहेब येक, तिसरी सखवारबाईसाहेब येक, चौथी सुकुमार बाईसाहेब येक, पांचवी गिरिजाबाईसाहेब येक, साहवी पार्वतीबाईसाहेब हे सहा स्त्रिया लग्नाच्या पैकीं वडीलांनी लग्नकेल्यात्या येक दोन जातां वरकड त्यांच्या प्रोढेंत करून घेतिल्या. तैशाच राख्या तीनी तैसेच तुकोजी राजाचे दुसरे लेंक राखे संमंधाने म-हाठ्याचे जातीचे राखीचे पोटी जन्मले प्रतापसिंह राजास लग्न केल्या स्त्रिया पांच—पहिली अहिल्या बाईसाहेब मोहित्याची, येक, यमराई मरहोवशी त्याची येक, सखववार बाईसाहेब मोहित्याची, द्रौपदी बाईसाहेब दुनबोची येक, यशवंत बाईसाहेब माहडीकाची 'येकून पांच स्त्रियापैकी वडिलानी लग्न केल्या त्या येक दोन जातां वरकड त्यांच्या तखीतांत करून-घेतिल्या त्या याखेरीज राख्या म-हाठ्या व नायडकूटाच्या बलजेवाराच्या देखील सात, प्रतापसिंह महाराजाची बहीन शामाबाई ह्मणून वरी लिहिलें आहे किं त्या शामाबाईसच मल्लारि गाडेरायास लग्न करून दिल्हें. आतां उरल्या तुकोजी राजाच्या नायडाच्या जातीच्या पांच राख्या पासून जन्मले पुत्र तीघेहीं तुकोजीराजा समोर देवगतीस पावल्या पैकीं नानासाहेब ह्मणणारास मात्र अपुसाहेब ह्मणून येक पुत्र त्यानी ब-हाड केल्या स्त्रियापासून जाहले होते. त्या अपुसाहेबास लग्न केल्या बाइका खेरीज बलजे वार वगैरे जातीचे राखीपासून येकपुत्र नानासाहेब ह्मणून जाहला तो अद्यापि सुखरूप आहे. आतां त्याच राखीचे संघांत जाहल्या दोघे लेंकीहीं तदनुसार गाडेकूटास दिल्ह्या. येणेप्रमाणे खत निशी जे—शरफोजीराजे त्यांचे धाकटे भावू संततीवंत तुकोजीराजे उभयतानी येकत्र राज्यभार करीत

असतां उभयतां भावांस ग्रहकृत्य वैशम्यामुळें तुकोजी राजानी कांहीं मुलूक वडील भावापासी मागून घेऊन महादेवपट्टणांत शाहार बसवून आपल्या सकल संसारानिशी महादेवपट्टणांत राहिले होते. किल्यांत शरफोजीराजे राज्यभार करीत असतां त्यांच्या पट्टस्त्रिया तीघ्यांपैकी दुसरी स्त्रि अपरूप बाईसाहेबयांस कित्येक दुष्ट स्त्रियानी बोधिले जे--- कनिष्ट भावास संतती वाहडली ज्येष्ट भावु राज्य करणारास संतती नाही त्याकरितां, राज्यपट्ट कनिष्ठास लागेलकीं ह्मणून बोधिले. बोधना रुचून त्या राजस्त्रियेने प्रथम बोधिल्या दुष्टस्त्रियानी सांगीतल्या यत्नाप्रमाणेच नसतां येक गर्भह्मणून बाहेर रंग करून, उपरि पुत्र प्राप्तीहीं जाहली ह्मणून वर्तमान सांगीतल्या वरून राजे व बंधु वर्गानीहीं संतोष मानून राजपुत्रास करावयाचा उत्सव करून त्या पुत्रास सवाई शहाजीराजे ह्मणून नामकर्णहीं केले. तदुपरि थोड्याच दिवसांत चालिलें कृत्रिम राजबंधू तुकोजीराजे महादेवपट्टणांत होते त्यांकडून व्यक्त बाहेर पडून शरफोजीराजानी फार आश्चर्य करून त्या पुत्राचा परिहार करावयाचे रीतीनें करून सोडिलेतरी नष्टजाहल्या पुत्राची कथा कां लिहावी ह्मणाल्यां पुढें याचे कारण सांगणे पडतें करितां लिहिलें. हे कृत्य येकंदर चालिलें ते तीघे राजस्त्रिया पैकी अपरूप बाईसाहेब ह्मणणांरानी दुष्ट स्त्रियेचे बोधनेस वश होऊन केलें. त्यां उपरि शरफोजीराजानी कित्येक दिवस राज्यभार करून शके १६४९ कीलक संवत्सरीं दैवगतीस पावले. त्या बरोबरी अपरूप बाईसाहेबा खेरीज सुलक्षणा बाईसाहेब व राजस बाईसाहेब उभयतांहीं अनुगमन केले. सवेंच त्यांचे भावू धाकुटे तुकोजीराजे महादेवपट्टणांतून येऊन तक्तनिशी जाहले. त्यानी राज्यभार करीत असतांच वरी लिहिलें त्यांच्या राखीच्या संबधांत तीघे पुत्र नष्ट जाहले. परंतू नानासाहेब ह्मणणारांचे संततींत अपूसाहेब मात्र आहेत ह्मणून वरी लिहिला अर्थ कारणानुसार लिहिला परंतू याचे राज्यांतच चालतो तेंव्हां त्रिचनापल्लींत मीनाक्षिअम्मा ह्मणूण नायडाची राज्यभार करीत होती. तिला पाळेगार वगैरे कारभारामुळें बहूत शल्य

जाहलें. त्यास तुकोजीराजानी आपल्याकडील सैन्य व सेनापतीसहीं पाठवून ते सैन्य येकंदर परिहार करून मीनाक्षीअंमास निःशल्य करून स्थापना केले. तदनंतरें तुकोजीराजे बहुतन्याय नीती कडून चांगल्या रीतीने राज्य करून शकें १६५७ नलसंवत्सरीं दैवगतीस पावले. सवेंच त्यांचे ज्येष्ट पुत्र पांचवे येकोजीराजे त्यांस बाबासाहेब ह्मणूनहीं नांवें. त्यानी येकवर्ष राज्यभार करण्यां त्यानी समीपचे त्या कोणावरीहीं पातेरा नाही कोणाची माजी कठार असल्यां नाही कोणाच्या हाती सुरी हसल्या नाहीं फार संशय मानणें; कोणी बिदीस जाणार येणार देखील कांही देवाचा नामोच्चार केला अथवा त्यांचा होंट हलूंलागला अथवा येकीकडें दोघे मिळून कांहीं बोलूं लागले; कोणाच्या हाती जपमाळ पाहिली तरीहीं त्यांच्याठांई आपल्यास वश करण्यास आपल्यास मारण्यास मंत्र यंत्र करिताहेत ह्मणून निश्चय कडून समजून त्याच्या पारपत्यासहींकरवणें; अणखी राजाचे समीपतेचेहीं चर्चा करण्याने थोरकीं त्यानी समग्र आपुली लेंकरें ह्मणून जे ह्मणतोल त्यांस नीट चालवणें; वरकडांस समीपतांहीं नाही. चालवणेहीं तदनुसरेंच. येणे प्रमाणे राज्यभार करण्यांत चंदासाहेब ह्मणून कोणी नवायीत सरदार आर्काड सुभ्याचा दोस्तरीखानाचा जांवांयीं त्या चंदासाहेबाने कित्तेक भारी फौज व फराशीसाकडीलहीं कुमुक घेऊन तंजाउरावरी युद्धास आला. तेंव्हां बाबासाहेब राजे उपद्रवाने अशक्त होते. तेंव्हांहीं किल्ला व आपले फौजेची बंदोबस्तीहीं चांगली करून, आपण किल्याचे बुरुजावरी येऊन किल्ल्या वरील तोफांचांहीं मार करून, फौजेसहीं त्याचे फौजेवरी जाऊन पडणेस निरोप देंऊन चांगले भांडणे भांडले. तेंव्हां चंदासाहेबास किल्ला घेणेस निर्वाह नाहींसें कांहीं पैक्याची बोली वारून घेऊन त्रिचनापल्लीस निघूनगेला. तदनंतरें बाबासहेब राजे त्याच उपद्रवाने शकें १६५८ पिंगळ संवत्सरीं दैवगतीस पावले. तेंव्हां अमात्यपण करणार व योग्य सोइऱ्यांतहीं राज्यपदास कोणी नाहीकीं ह्मणून त्या बाबासाहेबाची स्त्री

सुजान बाईसाहेबास सबेंच तक्तनीशी केले. तेंव्हां शके १६५८ पिंगळ संवत्सराचा बाकी काळयुक्ती संवत्सर देखील त्या सुजान बाईसाहेबाने राज्य- भार करीत असतां, सोय-यापैकी कौमाजी घांटके ह्मणणार येकाने पेसजी शरफोजीराजे राज्यभार करीत असतां दुष्ट स्त्रियेचे दुर्बुद्धीनें कृतृम पुत्र येकजण निर्माणहोऊन त्यालाच सवाई साहजीराजे ह्मणून नांवें ठेविल्यावरी कृतृम व्यक्त होऊन त्या कृतृम पुत्राचा परिहारहीं जाहलाहोता ह्मणून वरी लिहीलें आहे कीं—सांप्रत कौमाजी घांटका ह्मणणाराने तो सवाई शाहजीराजा ह्मणणार मूल वांचला आहे ह्मणून कुप्पी ह्मणून येक बटिकीणीचा लेंक रूप वयाने सहशहोता. त्यालाच तो शाहजीराजा वांचलातो ह्मणून प्रख्यात करून त्याला घेऊन वडेरपाल्याचे रानांत बसून संस्थानाचे नाते रहस्यांत पालेगार वगै-यास भ्रमें घालून त्यांकडून थोडें द्रव्य संपादून थोडी फौजहीं जमाकरून तदनंतरें देवणांपट्टणांत असणार इंग्रेजासी संविधान करून त्यांस नानाविध सांगून त्यांकडून कित्त्येक उपपत्तीकरून घेऊन तेथून नागपट्टण वगैरे स्तलांतून पलांदेवाल्याकडून कांहीं द्रव्य घेऊन फौज बंदीकरून तंजाऊरांत असणार फौजेस व किल्लेदारांस भ्रमासघालून त्यांच्या अंतरंग शल्ल्यावरून शकें १६६० काल्युक्तीं संवत्सरी किल्ला प्रवेश करून राज्यपद कारणार सुजान बाईसाहेबास लोटून परते करून आपण तक्तनिशीनें जाहले. तो रानांतून आलाह्मणून त्याला काटराजा ह्मणून लोक वदंती जाहली. त्या काटराजाने थोडेच दिवस राज्य करण्याने त्याचे चेंवेंवरून वळखून पेसजी त्याचे भ्रमांत पडले. ते किल्लेदार व फौजेसहीं हा काटराजा कुप्पी बटिकीचा लेंक याचेनांवें सुभान्या कृतृमे कडून राज्यपदास आला ह्मणावयाचें निश्चय कडून कळून अह्मी राजद्रोह करून बटकीचे लेंकास तखतीं बैसविलोंकी ह्मणून केवळ पश्चाताप पावून तजवीज केलीजे मायराजाची—तुकोजीराजानी परिग्रहकेल्या स्त्रियांपैकी प्रतापसिंह राजाची माय राजाची सम जातीजी जाहल्या करितां हा पुत्रच राज्यास योग्य ह्मणून सर्वलानी निष्कर्ष करून शके १६६० सिद्धार्थी संवत्सरी प्रतापसिंहराजास

तक्तनिशीने केले. तोच शक त्याच वर्षी प्रतापसिंहराजानी लग्नकेले पट्टस्त्रियांपैकी दुसरी स्त्री दुनगोची लेंके द्रौपदीबाईसाहेबाचे उदरी प्रतापसिंह राजापासून तुळजाराजे जन्मपावले. काटराजा कुप्पी बटकीचा लेंक त्यांचें नांवें सुभान्या तैशास तंजावुर राज्य परंपरेने भोंसल वंशाचे राजे राज्याधिपत्य करीत आले. तैशा राज्यास बटिकीचा स्योंक सुभान्या ह्मणणार अधिपति जाहला ह्मणणाराचे सकळ सोइरे धायरे व सकळ जनासहीं व्यक्त जाहल्यावरी ह्या कृतृमांत मिळाल्या सैंदाने परंपरेने राजवंशाची चाकरी करीत आलोंकी ह्मणावयाचे लोकलज्जेस्तवहीं आणखी यांत मुख्य येकोजीराजाचे परिग्रहीत स्त्रियापासून जाहले चंद्रभानजीभोंसले यांचे लेंक नायकजीभोंसले भाग्येंकडूनहीं शौर्येंकडूनहीं प्रख्यात होते—त्यांच्या भयास्तवहीं प्रस्तुत राजवंशी नामें प्रतापसिंह महाराज रूप, गुण, क्रिया, बुद्धि, या सर्व गुणांकडूनहीं योग्य आहेत ह्मणून प्रतापसिंह महाराजास तक्तनिशी केल्यावरीहीं तो सैंध कृतृमांतच होता. याखेरीज त्या सैंधाने अकृत्यहीं करीत आला. ते काय ह्मणजें प्रथम येकोजी महाराज या तंजावुर राज्यास अधिपति जाहल्यावरी या अगोदरी केले धर्म नव्हतां तंजावर राज्यांत बहुत देंबालय कावेरीतीरीं बहुत ब्राह्मण वसताती ह्मणून अग्रहार बांधवणें, ब्राह्मणांस सर्वमान्यदेणें, यज्ञादिक करवणें, अन्नछत्र घालवणें, या रीतीचे अनेकधर्म येकोजीमहाराजापासून परंपरेने इत्यादिधर्मं करीतच आले, त्यांत प्रतापसिंह महाराज तक्तास आल्यापासून विशेष धर्मं करीतच आले. या धर्मास येकंदर सैंद विरोधच करीत आला. याखेरीज आपण जातीचा तुरूक होऊन कर्नाटजातीच्याहीं सुळ्या देंवालयांत असणार या नावाल्या त्यांत येक मोहना ह्मणणार सुळीसही भ्रष्ट करून आपले घरीदेंखील ठेऊन घेतिले. इत्यादि त्यांची दुष्टकृत्ये व कृतृमें महाराजास प्रतिपदीहीं कळलें असूनहीं आपण नूतन राज्यपदाधिष्टित जाहलों ह्मणूनहीं त्या सैंदास दंडीनासे कित्येकदिवस त्याचा अधिकारहीं चालविला तरीहीं तो सैंध अपल्याकडे राजाची फौजदारी व तंजाउर कोटाची किलेदारी

व राजाची चिटनिशी ऐशे प्रबल उद्योग समग्रहीं आपले स्वाधिन आहेत, या अधिकाराच्या बळेंकडूनच मागें बटकीचालेंक सुभान्यास राज्य दिल्हों. परतून त्याला कैद करून प्रतापसिंह महाराजास राज्य व्हावेंयाजोगेंहीं केलें. अगोदरी बावासाहेब राजानी ठेविले सरखील सिद्धोजी वगै-यास काटराजा-कडून चित्रवधें करविलें. अणखी चिंतिलेंतें करूसकेन ह्मणावेयाचे उन्मत्ततेने आपली लेंक चंदासाहेबाच्या लेंकास देऊनें त्या चंदासाहेबाचे लेंकास तंजावुरचे राज्याचे तक्तावरी बसवून सकल ऐश्वर्यहीं आपण भोगावें ह्मणावयाची हृदयोचना करून आपला भावू सैंध काशीमाशी तजवीज केला. ते या भोंसलवंशाच्या पुण्यप्रभावेंकडूनहीं व प्रतापसिंह महाराजाचे योगें-कडूनहीं त्या सैंध काशीमास आपल्या भावानें केला राजद्रोह स्वा-मिद्रोह, विश्वास घातक, हे समग्र साहित्यासें अंतरंगे माहाराजास त्या सैंधाचे कृत्रुमें येकंदर त्याचा भावू त्या सैंध काशीमाने जाणत केलें. तेंव्हा प्रतापसिंह महाराज येकायेकी उचंबळनासे दूरवर योचना करून त्या सैंध काशीमास तुझयासांगण्याचे प्रमाण काय ह्मणून विचारिले. त्या काशीमाने थोड्याच दिवसांत माझ्या सांगण्याचे निदर्शन महाराजास येयील ह्मणून निरोपघेऊन घरास गेला. सवेंच चार पाच दिवसांनंतरें सैंदानें तबक मुस्तीद करून, महाराजापासी ठेऊन, आपली मूले चंदासाहे-बाच्या लेंकास देतों, तेणेकडून संस्थानास बलच आहे ह्मणून अर्ज केला. तेंव्हा महाराजानी बऱ्रखून अमच्या राज्यास बळें व्हावी ह्मणून आपली लेंके देखील नबाइतास देताहेत ह्मणून श्लाघना करून पाहिजेते लग्नाचे खर्चास देवून लग्नमाल किल्यांत करणें गरजनाहीं मध्यार्जुनी करणे ह्मणून मल्यापणाने सैंधास सांगीतले. तेंव्हां सैंधाने कबूल करून तैसेंच मध्यार्जुनास जावून अतिशय वैभवंकडून लग्नहीं करून परतून किल्ल्यास येऊन पावल्यानंतरें त्या सैंधानें केलें कृत्रिम काय ह्मणजें—चंदासाहेब प्रभृतींस तुह्मी मध्यार्जुनांतून रातोरात निघून अरुणोदय कालीं किल्ल्यास पावणें, त्यावेळेस दंडकाप्रमाणें

किल्ल्याचे दरवाजे उघडतांच फौजेनिशी किल्ल्यांत शिरून, राजगृहावरी हल्ला करून आंत शिरून, खतल् करून राज्य स्वाधीन करून घेणें, फौजदारी व किल्लेदारी दोनी आपलेस्वाधीन आहेत्या करितां तुह्मास कोणी समोर होणारनाहीं, ह्मणून कागदलिहून आत मनुष्याकडे देऊन रस्याने पाठविला. ते त्या सैंधाचाच भावू सैंदकाशीम ह्मणणार या कागदपत्राच्या रहस्यांत होत्या करितां याकृत्रिमाची पूर्वी सूचना मात्र महाराजास कळविली ते नव्हतां महाराजाचे अंतरंग मनुष्य घेऊन त्यांकडून सैंधाने लिहिला जिनस व कागद व कागदनेले मनुष्यासहीं धरून महाराजाकडे ओपिले. यारीतीची प्रबळसाक्षी महाराजास पावल्यावरी महाराज अत्यंत आश्चर्य व अतिशय क्रोधासहीं वश्य होऊन आपल्या आप्तपरीवार कित्त्येकास मिळवून त्यांत मुख्य सरदार मल्हारजी गाडेराव महाराजाचे मेव्हणे, व अनपाशेटगे महाराजाचे मुख्य कार्यस्थ, मानाजीराव जगताप महाराजाचे आप्त सरदार इत्यादिकांस आपली हृदयोचना व्यक्त कळवून सैंधास मारणेचा निश्चय करून येक्यादिवशी आपल्या सरदारास व आप्तलोकांस येकंदर संन्नाहानिशी येक्यास्थलीं दबवून ठेऊन आपण येक्याठिकाणी प्रत्येक बसून मोगलाकडील कित्त्येक कागदपत्रें पाहावे लागताती ह्मणून सैंदास बलावून पाठविले. तेंव्हां सैंदाच्या उन्मत्त दर्शें करित्तां महाराजाची योचना कोणतीहीं कळनासें जाहल्यास्तव महाराजा कडून सात पांच बलावणी घेऊन महाराजापासी येवून पावला. तेंव्हां सैंधाचें उन्मत्त दर्शेंकरीतां महाराजानी त्याशी येक क्षणभर उपचाराने बोलून लघुशंकेचे व्याजेंकरून आपण अन्यत्र महालास गेले. तेंव्हां महाराजाचे पूर्वसंकेताचे आर्तप्रमाण त्या त्रिवर्ग सर्दारानीहीं सैंदाकडील येक मनुष्यहीं सैंदाकडे नाहीशी बंदोबस्ती अगोदरीच करवीले होते करितां चिल्लर मनुष्यास सैंदाकडे पाठवून त्याला हालून देयीनासें हात पांय बांधून अन्यत्र स्थलास आणवून त्याला परलोक गतीस पाववीले. सवेंच त्याच्या घरा वरीहीं हल्ला करवून पळालेते जातां उरल्यास शतुशल्य नाहिंसें केले.

तदनंतरें महाराजानी, अनापाशेटग्यास सैंधखलाव फौजदारी, मल्हार गाडेरायास किल्लेदारी, डब्बीर नादोपंतास चिटनिशी, येणेप्रमाणें अधिकार देवून राज्यभार सुरक्षित करून चालते केले. तदनंतरें महाराज श्रीरामेश्वरास यात्रेस सकल संन्नाहानिशी जावून यात्रा करून बहुत दान धर्महीं करून परतून येतेवेळेस रामनाथपुर मरवर जमेदाराने परंपरेकडून महाराजकडून आपले राज्य स्थापित ह्मणावयाचे कळव्या करितां गांवेंभर भोय येऊन आपल्या किल्ल्यास येऊन पाहून येकदिवस असून जावें ह्मणून प्रार्थिले. तैसेंच महाराज अंगीकार करून गेले. तेंव्हां दरवाज्यांतील लोकानी न कळतां मांघून येणार चिल्लरांस अटकाविले. ते महाराजास कळून तैसेच परतून चालिले. तेंव्हां रामनाथपुरचे राज्य करणार बहुत भय बहुत विश्वासें करून दोन घटिका पावेतो महराजाची पालखी धरून घेऊन, महाराजास बहुत प्रार्थिल्या करितां महाराज बहुत दयावंत होऊन परतून रामनाथपुरास जावून येकदिवस राहून त्याकडील पूजा पावून परतून आपल्या स्वराज्यास पावले. रामनाथपुरवाल्याने अलीकडें नानाच्या दाक्षिण्यास्तव नबाबाचा ह्मणविला तरींहीं आदी विसरनासें महाराजाची शेवा केली. पेसजी बावासाहेब राजाचे राज्यभार शेवटी चंदासाहेब ह्मणणार त्रिचनापल्लीचे किल्ल्यावरी जाऊन उतरला ह्मणांवयाचे वरी लिहिलें आहेकीं त्या चंदासाहेबाने त्रिचनापल्लीचे राज्य साधून आपण तंजाउरास प्रतापसिंह महाराजास राज्यहोतांच येऊन घेरिलें. तेंव्हां प्रतापसिंहराजे दोन महिने पावेतो चंदासाहबासी चागलें युद्ध केले. त्यानंतरें चंदासाहेबाने यांसी काय भांडणें हे किती दिवस काय खावून भांढतील पाहूं आपल्यासहीं त्रिचनापल्लींकडें पाळेगाराची बंदोबस्ती व्हावी लागते ह्मणून आर्काडांतून बरोबरी आलातो सबदरअलीखानास तंजाउरचें राज्यसमग्र येक पटकोट सुभाविना जमा करून सभदर अलीखानाकडे ओपून आपण त्रिचनापल्लीस गेला. तदनंतरें सभदरअलीखान राज्य आपल्यास जिरेलं किल्ल्यांत असणार राज्य कार्य करून पाहातील

ह्मणून खंदकाची वाली देखील आपलीकरून घेऊन, तिरवादीस पश्चिमेकडे आपल्या नांवें सबदरअल्लीआना ह्मणून नांवें ठेऊन अणाहीं घालून दोनवर्षे बसला. तेंव्हां प्रतापसिंह महाराजास फार संकट पडून फौजेस देणेस व आपले खर्चासहीं तुटारा पडल्या मुळें फौज, भांडण्यास वजनासें गेल्याकरितां साता-यांत शाहूराजास पत्रलिहून पाठविले. तेंव्हा शाहूराजानी वीरूबाईचे औंटीस घातिलेते नागपुरीं असणार रघोजी भोंसल्यास व फतेसिंगासहीं साटहजार स्वार देऊन पाठविले. त्यानी अतित्वरेने घाट उतरलेते वर्तमान ऐकतांच, सबदरअल्लीखान मुलूक सोडून, त्रिचनापल्लीस पळाला. उपरी राजास मुलूक मोकळाझाला. त्यानंतरें रघोजी भोंसले व फतेसिंग उभयतां त्रिचना-पल्लीस येऊन समोर मधेरेतून आलातो चंदासाहेबाचा भाऊ व सबदरअल्लीखा-नासहीं मारून चंदासाहेबास धरून कैद करून त्रिचनापल्ली किल्ला घेतला. तेंव्हां प्रतापसिंह महाराजानी त्याकडे आपले अमात्य अन्नप्पाशेटक्यास पाठविले. त्यानी जाऊन रघोजी भोंसले व फतेसिंगाची भेटी घेतांच त्यानी त्रिचनापल्लीची किल्ली ओपून ध्या ह्मणाले. तेंव्हां राजानी त्याचा अंगीकार करीनासें सांगून पाठविल्या वरून रघोजी भोंसले फत्तेशिंगानी त्रिचनापल्लीचें राज्य व किल्ला देखील राजीघोरपडेचे लेंक मुरारजी घोरपडे यांकडें देऊन, आपण चंदासाहेबासही घेऊन, साता-यास शाहूराजाकडे गेले. इकडे प्रतापशिंहराजे तंजाउर देशाचे राज्य करीत होते. तदनंतरें अन्नप्पा शेटक्याने सरखेली केल्यांत राज्य तंत्राची कामें येकविधेंकडून चालते केले तरीहीं कित्त्येक उद्धट कृत्य करूंलागले. त्याचा जिनस थोडा कळवितों जे—महाराजाचे योग्य साज येकंदर आपण व आपले बाइकास येकंदर करूंलागले. याखेरीज महाराजा समीप येते वेळेसहीं व समक्षेमांतहीं महाराजासी बोलण्यांतही उद्धट कृत्येंच करूंलागले. तेणेकडून महाराज कांही मनोवैकल्यातें पावून अन्नप्पाची सरखेली काहडून, मानाजीराव यांस सरखेलीहीं व फौजदारीहीं देऊन, अन्नप्पाशेटक्यास थोड्या दिवसाच्या कामास घरीच

असा ह्मणाले. ते अन्नप्याशेटक्यास साहीनासें सरखेली व फौजदारी आपल्यास बहूत दिवस चालिल्या करितां फौज तमाम आपल्यास वशांत असेल ह्मणावयाचे दुर्भ्रमें करून आपले भावूबंदांसमवेत केसरी कापडें लेवून बाहेर विधान करून बसले. तेंव्हां महाराजानी पूर्वींच या अन्नप्पाची दुष्टप्रकृती वळखिले होते करितां त्याच संशयाने तुह्मी हत्यारा पत्यारानिशी बाहेर बसाव यास कारण काय ह्मणून विचारून पाठविल्यास अन्नप्पानी सबूरी न करितां जा महाराजाचे अन्नखावून थोरवोस पावलेकी त्यावरीच हत्यार घरून येकदोघांस जखमीहीं केल्यावरी महाराजानी कळून अटोपत नाही ह्मणून आपल्या लोकांस हल्लयास निरोप दिल्हे. त्यांच्या यांच्या मारामारींत अन्नप्पा व त्याचे भावू वगैरे सहासात जण ठार जाहले. तदनंतरें महाराजास अन्नप्पा शेटक्यानी सरकारांची चाकरी केली ते आठवास येते वेळेस समग्र अन्नयास मारिला तो पश्चात्ताप पावण्यासहीं कारणहोतें. तदनंतरें त्रिचनापल्लीचे किल्लयांत असणार मुरारजी घोरपडे यानी आपले अमात्य इनीसखान ह्मणणार तुरकाचे बोधणे वरून तंजाउर राजाचा मुलूक थोडा जाहला तरीहीं चांगले राज्य जाहल्या करितां समग्र राज्य आक्रमावें तरीहीं तेथील राजे आपले यजमान यास्तव कांही मुलूक स्वाधीन करून घ्यावें तेंहीं केवल फौजबंदीने देयीनात करितां चिल्लर उपद्रव करीत असावें ह्मणावयाचें बुद्धीनें इनीसखांना बरोबरी २,००० स्वार तैनात करून पाठविले. त्या इनीस खानाने तंजाउरच्या किल्लयांत कोठें लुटणें, कोठें मारणें, भांडण्यास समोरे होईनासें येक दोन चिल्लर उपद्रव फार आरंभिला. तेंव्हां, प्रतापसिंह महाराजाने आपला सेनापती मानाजीरायास निरोपून समागमें थोडी सेनाहीं देवून पाठविले. त्यानी जावून थोडे दिवस त्या इनीसखानाचा पाठलाग करीत जावून शेवटी येकटा नदीचे कांठी सांपडून तीनशें स्वार ठारमारून सात पांचसें घोडे व मनुष्यहीं पडावू धरून आणिले. त्या भांडण्यांत सरदार इनीसखान ह्मणणार गुंत होऊन गेला. तेव्हढ्याने देशास मुराराायाचा उपद्रव

राहून गेला. तदनंतरें महंमद अरब ह्मणणार येकजण तो कोण ह्मणजें— पेसजी चंदासाहेब उत्तरदेंशाहून याप्रांतास येऊन त्रिचनापल्लीचे राज्यहीं साधून तंजाउर राजावरीहीं युद्ध करून शेवटी रघोजीभोंसले व फत्तेसिंगाच्या हाती सांपडून पुणें प्रांतांस जावून, शाहूराजाकडून गडप्रवेश पावल्यानंतरें, त्याच्या संगतीस होतातो महंमद अरब ह्मणणार थोर सरदार, दोन तीन हजार स्वार, पांचहत्ती थोडेबारहीं, इतुक्या फौजेनिशी उघडून कोणाच्यां आश्रयांतहीं राहवेनासें आपण फूट होऊन, पुदुचेरींत फराशीसांचा आस्रा थोडा करून घेऊन, मुलुकांत तमाम लुटणें, रात्री वडेरपाळ्याचे रानांत दबून राहणे, असें बहुतदा केल्यामुळें तंजाउरचा मुलक व त्रिचनापल्लीचाहीं केवळं तोराजी त्याला तेंव्हां प्रतापसिंहराजाने आपले किल्लेदार मल्हारजीगाडे या समागमें मानाजीराव जगताप यांसहीं कित्येक सन्हाहा देऊन पाठविले. त्यानी येक महिना पावेतो त्याचे पाठीसी फिरून शेवटी तिकाटपल्ली ह्मणावयाचे किल्ल्याजवळ त्या महंमद अरबास सांपडवून त्याचे हत्ती, घोडें हिरून घेऊन त्याकडील जुलूफकवरखान् ह्मणावयाचे बिरूदाचे निशानासहित कित्त्येक त्याची बिरुदेंहीं हिरून घेऊन त्याकडील बहुत लोकांसमवेत त्या महंमद अरबासहीं मारून टाकिले. प्रतापसिंहराजानी संतोष पावून त्याकडील बिरुदेंसमग्र मल्लारजी गाडेरायास कित्त्येक व मानाजीरायासहीं थोडी दिल्हि. देवीकोटचा किल्ला साधणेच्या हेतूने इंग्रेजाची फौज कित्ये येऊन देवीकोट बंदरचा किल्ला साधिला तरी महाराजांस इंग्रेजासहीं बिगाड नसतां त्यानी येण्यास कारण काय ह्मणिजे देवीकोटचे थोरसें इंग्रेजाकडील येक जहाज पडावू जाहली. त्यापैकीं कित्त्येक सामाने व येक दोनी कुतरी महाराजानी ठेऊन घेतल्या करितां त्याविषयीं इंग्रेजास ते बंदर अपल्यास पाहिजे ह्मणावयाच्या हेतूवरून येऊन घेतले. तेंव्हां महाराजानी फौजदार नानाजीरायास बरोबरी फौज देंऊन पाठऊन परतून देवीकोटच्या किल्ला युद्ध करून घेतला. तेंव्हां देवीकोटच्या किल्ल्यांत मंहाराजाचे हुकुमाप्रमाणें

जफर साहेब ह्मणारास किल्लेदारी देऊन ठेऊन आपण तंजाउरास येऊन पावले. परतून दुसरा कित्ता इंग्रेजाचीं फौज देवीकोठचे किल्ल्यावरी आली. तेंव्हां महाराजानी कित्त्येक सरदारास फौजहीं देऊन त्यावरी पाठविलें. त्या युद्ध प्रसंगी इंग्रेजाची फौज सोलदाज वगैरे यावर दलक कोलडचे कांठासी उभे होते. तंजाउरची फौज त्यांवरी जाणेस कोल्लड नदीचा कांठ बहुत उन्नत जाहल्या करितां भलतीकडें उतरणेस घोडेस्वारास वाट नाहींसें पलीकडून वाटेने उतरून येकाच मार्गाने येणे पडिलें करितां त्या समयीं नदींत फौज समग्र उतरून येते वेळेस इंग्रज-याकडील लोकानी मार धरिल्या करितां नदीच्या वाळामुळें घोडे खेळवणूकेस देखील नाहींसें जाहल्या करितां कित्येक स्वार जायां होऊन येक सरदार वीरप्पा ह्मणणार रणास आला. तदनंतरें इंग्रेजानी महाराजासी सलक बोलून येक करारनामाहीं लिहून दिले त्यावरून देवीकोटचा किल्ला इंग्रेजांस दिल्हा. ते सन् १७४९ इसवींत. तदनंतरें हैदराबादेंत होतेते थोरले निजाम शाजदीखान ह्मणणारानी दक्षण प्रांताचे वर्तमान ऐकणेंत चंदासाहेबाने दास्तल्लीखानाचे लेंकास बदरल्लीखान वगैऱ्यांस घेऊन पारशींचा स्नेहहीं करून त्यांची कुमुकहीं घेऊन त्रिचनापल्लीचे राज्य साधिले. ते ह्मराटे शाहूराजाकडील रघोजी भोंसले फत्तेशिंगानी जाऊन तंजाउरचे राजाच्या कुमकेस्तव गेले. त्यानी त्रिचनापल्ली राज्यहीं घेऊन चंदासाहेबास धरून आणून गडावरी घातिले. हे समग्र ऐकून त्रिचनापल्लीवरी बाच्छाई निशान चढविले. ते आपण जीवंत असतांच उतरणें विहित नव्हें ह्मणून शाहूराजास आत्मार्थें करून कागद पत्र लिहून त्याचे अनुमतेवरून ऐंशीं हजार स्वारानिशी स्वारहोऊन त्रिचनापल्लीस पावले. त्रिचनापल्ली किल्ला मुरारराया वरी राज कारण सहा महिने करून मुरारजी घोरफडे यांस कौलावरी बाहेर काढून त्रिचनापल्लीचा किल्ला व आर्काडची सुभेदारीहीं अनवरदीखान ह्मणणार समागमें आले होते त्यांचे स्वाधीन करून आपण हैदराबादेस निघून गेले. आर्काडसुभा व त्रिचना-

पत्नीचे राज्यासहीं अधिकारी अनवर्दीखान जाहल्या करितां त्याचे पुत्र मापोसखानानी आर्काड सुभ्याच्या नात्याने तंजाउरची पेषकषी यावी ह्मणून जाबाबस्वाल केले. तेंव्हां प्रतापसिंह महाराजानी कित्येक सोडवणूकेचा प्रसंग वाजवी प्रकारें सांगून पाठविल्यास समजेनासें मापूसखानाने आपले फौजानिशी युद्धास आले. तेंव्हां प्रतापसिंह महाराजानेहीं आपली सेना पाठविले. उभयतांस युद्ध तंजाउरचे किल्ल्यास उत्तरेस येक कोसावरी चांगलें भांडणें झालें. तेंव्हां, मापूसखानाने त्याच्यां फौजेचाहीं निर्वाह नाहीसें फौज वाताहत होऊन मापूसखानाने पराजय पावून निघून गेले. तेंव्हां पाडावू सांपळ्याचा आदर करून परतून खान मजकूराकडे पाठविले तदनंतरे मापूसखान आपण पराजय पावले व्यसनानें आपले बाप अनवर्दीखानास जाऊन सांगीतले. तेणेकडून अनवर्दीखानानी योचना केली जे—तंजाउरचे महाराजानी जबाबस्वाह युक्तच केले. त्यास मापूस खानानें समजनासें जलदी केल्या करितां भग्नजाहला. परंतु बाच्छाईफौज माघारली ह्मणावयाची ईर्षा थोडी अंगीकारून अनवर्दीखानानी भारी फौज स्वार बार, तोपखाना, व कालहस्ती व्यंकटगिरी, वेढवल्ल, वगैरे स्थलचे पाळेगार वगैरे समग्रांस घेऊन तंजावरचे राजावरी युद्धास स्वार होवून तंजाउरास ईशान्य भागीं तीनी कोसावरी पशुपतिगुडी ह्मणावयाचे गावां-समीप मैदानांत उतरले. तेंव्हां प्रतापसिंह महाराजाने आपुल्या फौजापैकी तीन हजार स्वार व थोडे बारहीं, जरोरी तोफखाना वगैरे सन्नाह, गोवींदराव शेटगे व मानजीराव जगताप इत्यादि सरदार समागमें देवून पाठविले. उभय सेनाहीं जमून प्रातःकाल समयीं युद्ध जाहल्यांत तंजावरची फौज-समग्र आंत शिरून त्यांच्या तोफखानासहीं माघें टाकून अनवर्दीखानाची फौज तमाम ढवळून जावून तंजाउरचे फौजेकडून बहुत फौज मारली गेली बहुतजन नामांकित देखील पुढें टिकवनासें पळूनगेले. शेवट तंजवुरचे फौजेचे लोकानी अनवर्दीखानाचा खांस स्वरीचा हती भाल्या बरचीच्या

मारांनें खिळून उभा करून उब्या टाकून हत्तीवरी चढून अंबारीच्या काहण्या कापूंलागले. तेंव्हां अनवर्दीखान सांपडला जाऊन चार घटकापावेतो अपले तोंडाने तंजाउरचे फौजेचे लोकांस प्रतापसिंह महाराजाची दुराई देऊन राहतें केले. इतक्यांत किल्ला समीप जाहल्या करितां महाराजास हे वर्तमान कळून महाराजानी बाच्छाई सुभेदार जाहल्या करितां या अनवर्दीखानास सोडून येणें ह्मणून निरोपिल्या करितां फौज निघून आली. तदनंतरें, खान मजकूरानी महाराजास, वस्त्र पत्र, पाठवून, महाराजाकडूनहीं आपण वस्त्र, पत्र, पावून, संविधानहीं येक्यारीतीनें वारतेंघेवूंन, अनवर्दी खानाने आर्काडास निघून गेले. त्यासंधींत येक पांडरा हत्ती आला होता. तदनंतरें पेसजी रघोजी भोंसले व फतेसिंग त्रिचनापल्लीचे पारपत्यास आले होते. तेंव्हां चंदासाहेबास धरून नेवून गडावरी घातले होते ह्मणाक्याचा अर्थ वरी लिहिला आहे कीं त्या चंदासांहेबास बलावून तुला सोडितों तूं कोठें पाहिजे तेथें जा. परंतूं तंजाउरराज्य अमचे स्थल जाइल्याकरीतां त्याचे वाटेस तां जाणे गरज नाहीं ह्मणून त्यापासून लिहिले. व प्रमाणहीं घेवून त्या चंदासाहेबास सोडून दिल्हे. तो चंदासाहेब तेथून निघून आदरानी सहिरांस्त मोहिदीन् खानाकडें पावून त्याशी बोलन पंचवीस हज़ार स्वार व तदनुसार बार तोफखाना वगैरे सन्नाहा निशीहीं रास्तमोहिदीन्खान् चंदासाहेबा सहित दक्षिण प्रांतास स्वारीचे वेळेस फराशीसासहीं पत्र पाठवून संविधान लावून बरोबरी त्याची कुमुकहीं घेवून आर्काड सुभेदार अनवर्दीखानास मारून आर्कांडास पावले. तेंव्हां आर्काडांत होतेते महंमदअल्लीखानाने गुप्त-मार्गे कडून नागपट्टणास पावून दोन तीन दिवस तेथें राहून तेथून प्रतापसिंह महाराजास कागदपत्र पाठविले. महाराजानी त्या कागदाची नम्रता व वेळसमयहीं मनास प्रार्थिले. त्यास आह्मी आश्रां देणेंच विहित पलीकडें चंदासाहेब व हिरासत मोहिदीन्खान् यांकडून आला उपद्रव येवो पाहूंघेवू

ह्मणावयाचें हडतेंनें नवाब महंमदअल्लीखानास बलावून घेऊन आपले वाड्यामधील खांस बागा मधील महालांत स्थल करून देऊन ठेऊन घेतिले. नवाब महमद अल्लीखानानी तीन महिने महाराजाच्या आसेंत असून श्रीरंगपट्टणचे कर्तर व देवराज दळवाई यांसीं व दक्षिणप्रांतीचे पाळेगारां समग्रांसहीं व हैदराबादेस ज्यासरजंगास व आर्काडपट्टीचे कालहस्ती, वेंकटगिरी बोम्मराज वगैरे भारी पाळेगारासहीं पत्र लिहून पाठवून तीन महिन्यानंतरें आपण त्रिचनापल्ली किल्ल्यास जावून पावले. त्या दिवसांत प्रतापसिंह महाराजानी आपले पुत्र तुळजा महाराजास नवाब महम्मदअल्लीखान राजाचा आसांत येईनाते अगोदरीच त्याचे प्रथमलग्न मोहितेयांची लेंकीस घेऊन केले. त्या बाईसाहेबाचे नाव राजसबाई साहेब ह्मणून. तदनंतरें कित्त्येक दिवसानंतरें महाराजाची प्रथमस्त्री अहल्याबाई साहेब परमपदास पावले. चौथीस्त्री यशवंतबाईसाहेबाचे उदरीं दोघ्याकन्या जन्मल्या. पुढें त्या दोनी कन्यांस लग्नाचा काल प्राप्तजाहल्या वेळेस येक कन्या माडीकास, येक कन्या लिंबाळकरास देऊन लग्न जाहले. प्रतापसिंह महाराजाचे राख्या सातजणापैकीं अन्नपूर्णाबाई ह्मणणार राखीचे पोटीं रामस्वामी ह्मणून येक, कृष्णस्वामी येक, ऐशे दोघे लेंक जाहले. परंतू ते विहित मार्गेंकडून नाहीत अवहित मार्गें कडून उत्पन्न जाहले ह्मणून लोकवदंती प्रख्यात होती. त्यापैकीं धाकटे लेंक कृष्णस्वामी ह्मणणार कित्त्येक दिवस वाहडून दैवगतीस पावले. जेष्ठ लेंक रामस्वामी ह्मणणार होते. त्यांचे नांवेंच अमरसिंह ह्मणून रूढी पडली. ह्या चार बाबती निहिल्या स्या येक कालींच असनात सात पांच वर्षें मागें पुढें असतील. कळावयास्तव लिहिलें. तदनंतरें पलीकडील पूर्वोत्तर लिहितों जे—हिरासत मोहिद्दीनखान व चंदासाहेब देखील दक्षिणप्रांत साधणेच्या हेतूने निघून पुदुच्चेरीच्या वाटे त्रिचनापल्लीस जाणारानी प्रतापसिंह महाराजास कांहीं फौजेच्या खर्चास मागून पाठविले. महाराजानी नवाब महम्मद अल्लीखानाचा अमचा स्नेह विशेष जाहल्या करितां त्याच्या शत्रूस

दोन तीन भांडणी चांगल्या रीतीनें दिल्ही. चंदासाहेब प्रभृतीनी दोन तीनदा किल्ला पाहून हल्लाचढून आले. त्यास येकंदर महाराजानी पाडिला. किल्ला येकंदर त्या त्या ठायीं सेवेंच सेवेंच मजबूत करून ज्या ज्या वेळेस चढला हल्ला त्या त्या वेळेस आपल्या शौर्येंकडून परतविल्यांत चंदासाहेब प्रभृती भग्नहोऊन कांहीं भांडणें, कांहीं संविधान ऐसें करीत होते. त्यांस महाराजानी आस्पद न देतां दोन अडीच महिने भांडत होते. इतुक्यांत नाजरजंग बहुत सन्नाहानिशी हैदराबादेंतून निघून आर्काडास आले त्याचे हरोल स्वार पुढें आले. त्यानी आर्काडांत होतातो चंदासाहेबाकडील सरदार शेषरायास मारून टाकिले ह्मणावयाचे वर्तमान चंदासाहेबास पावतांच चंदासाहेब वगैऱ्यानी तंजाउरचे किल्ल्यावरी वेढा दिल्हे होते—ते हिरासत मोहिदीनखाना समवेत कित्येक सामान देंखील टाकून देऊन येकंदर पुदच्चेरीस जावून पावले. नवाब महम्मदअल्लीखान त्रिचनापल्लींतून निघून नाजरजंगा समोर आर्काडास पावले. तेंव्हा तंजाउरास कुमुकेस सांगून पाठविले. तेंव्हां महाराजानी आपले फौजदार मानाजीरायास फौज देऊन नाजरजंगाचे लष्करास कुमुक पाठविले. त्यानी जाऊन कित्येक दिवस असून परतून येऊन पावले. त्यानंतरें नाजरजंग देवगतींस पावले ह्मणावयाचे वर्तमानहीं आलें. सेवेंच चंदासाहेबानी नाजरजंग दैवगतीस पावतांच निघून त्रिचनापल्लीस युद्धास येवून श्रीरंगांत फराशीसाची कुमुकहीं घेवून उतरले. तेंव्हां तंजाउर राज्यांत चाकर जमादार अल्लंखान ह्मणणार पठाण येक शंभर घोड्याचा यजमान त्याने प्रतापसिंह महाराजासी बिगडून अपला हक्कधरून घेवून चंदासाहेबासी मिळून त्याची परवा न करून घेवून कित्त्येक पठाणास मिळवून घेवून त्यास अल्लंखानाचा मेव्हणा मधरेच्या मुलुकांत तुरुंबुरूचा जाहगीरदार येक होता त्यासी संविधान करून घेवून नाडचें कल्लर कित्त्येक मिळवून मधरेवर जावून उतरून मधरेचे किल्ल्यांत मापूसखानहोता त्यासी भांडून त्याला त्रिचनापल्लीस पळवून आपण मधरा, त्रिनवलीराज्यें साधून

थोडेच दिवसांत तीन चार हजारस्वार फौज जमाकरून त्या फौजेनीशी चंदासाहेबास कुमुक आला. येकून चंदासाहेब येक, फराशीस येक, अलंखान येक, ऐशे तीघेजणहीं येक होऊन त्रिचनापल्लीवरी युद्धास सन्नद्ध जाहले. तेंव्हां महंमदअल्लीखान त्रिचनापल्लींत असून आपल्यास केवळ आप्त ऐशे तंजाउरचे महाराजासी सांगूण पाठविल्याक्षणी महाराजानी आपली फौज हजार स्वार, पंधरा हजार पांयदळ, भारी तोफखाना, व रस्त वगैरे देऊन मानाजीराव सर्दारासहीं देऊन कुमुकेस पाठविले. तैसेंच विजयरघुनाथनायड मानाजी थोडीबहुत आपली फौज देऊन पाठवून शेवटी रस्तेची कुमुक केले. तैसेंच रामनाथपुरचे मरवर व वोडयातेवर यानी थोडी कुमुक पाठविले. त्याखेरीज श्रीरंगपट्टणाची भारी फौज घेवून नंदराज दळवाईयानी सैदंखदू ह्मणणार सरदारा कडून नवाव महमदअल्लीखानानी सांगून पाठविले करितां आपल्या कडील सरदार कत्ती गोपालराज ह्मणणारास त्रिचनापल्लीचे किल्यांत पाठवून नवाब महमदअल्लीखानास कांहीं द्रव्यहीं देऊन आपण आपल्या भारी फौजेनिशी महंमदअल्लीखानास कुमुक आले. तैसेंच मुरारजी धोरपडेहीं नवाइतासी आपल्या फौजेनिसी कुमुकेस आले. येणेप्रमाणे चंदासाहेब, महंमदअल्लीखान, मुरराजी धोरपडे वगैरे उभयतांची फौज उतरून युद्धास सन्नद्ध होऊन प्रथम अलंखान ह्मणणार तंजाऊरचा चाकर होंता. तो मधरेचा मुलुक साधून चंदासाहेबास कुमुक आला. तो अपले फौजेनिशी इतर फौजहीं कित्येक घेऊन तंजाउरचे सरदार मानाजी रायांस सन्मुख युद्धास आला. तेव्हां मानाजीरावहीं आपली फौज सन्नद्ध करून युद्धास सन्मुख होऊन येकमेकांस हातमिळून गोळागोळीचे युद्धहोत असतां इंग्रजाकडील सरदार मेदर ह्मणणार थोड्या फौजेनिशी त्रिचनापलीचे किल्यास जाणार वाटेंत मानाजीराव युद्धास सन्मुख होते त्यांस पाहून मेदर मजकूर मानाजीरायासी येऊन वर्तमान विचारिले. राव मजकूरानी सकल पूर्वोत्तरहीं जाणते केले. ते ऐकून घेऊन मेदर

मजकूर तोफखाना जवळी येऊन आपल्या हताने तोफा फिरवून ठेऊन शिर पाहून चार पांच बार केले. त्यांत येक गोळा जावून हौद्या वरील अलंखानाचे गळ्यास लागून त्याचें डोसकें उडालें. सेंवच तंजाउरचे थोडे स्वार अलंखानाचे फौजेवरी पडून मारामारी केल्यांत रणास आली फौज जातां उरलेतें टिकावनासरिखें वाताहत होवून गेली. उरलेते सांपड-लेल्यांस धरून घेवून तंजावरचे स्वार मानाजी रायांकडे पावले. येणे-प्रमाणे पाहिली फत्ते तंजावरच्या कडून महमदअल्लीखानास जाहली. तदनंतरें महम्मदल्लीखान् व चंदासाहेबास युद्ध लागलें ते बहुत दिवस वाहडलें. श्रीरंग व त्रिचनापल्लीस मध्ये कावेरी आहे करितां कांवेरीचे उत्तरेचे कांठीं चंदासाहेबाचे तरफेनें फराशींसांचे मोर्चे कावेरीस दक्षिणेचे कांठी नवाब महमदल्लीखानाचे तर्फेनें इंगरेज्याचे मोर्चे येणेप्रमाणे युद्धास लागलें. तेंव्हां नंतराज व मुरारजी धोरफडे व मानाजीराव जगथाप यानी समग्र चंदासाहेबाचे फौजेस येकदा पारिस्त सोडिनासें चहूंकडून वेढून निर्बंध केल्यामुळें चंदासाहेबास खर्चासहीं नाहींसें व रस्तहिं नाहिंसें फौज बेदिल्ल होऊन फौजेचा समग्र दंगा जाहल्या समयीं चंदासाहेबानी निघून जावें ह्मणालियांहीं कोठेंहीं वाट नाहीसें वेढिल्यास्तव आपली फौज आपल्या आटेप्यांत येईनासें जाहल्या करितां चंदासाहेबानी तजवीज केली जे; आपण केल्या मनसोब्यांत येकहीं फळलें नाहीं येथून कोणाकडे जावें यास ठाव नाहीं असो गेलों ह्मणिजे कैसेहीं वांचू ह्मणालियां फौजेचेलोक सोडीत नाहीत; बाहेरहीं वेढा पडला आहेकरितां, अमचे फौजेचे लोकच उद्या परव्हां आह्मास धरून, महमदल्लीखानाकडे ओपून देतील. महमदल्ली-खानाचे बापास आपण मारिले आहे. त्याकरितां तो दावा घेईल; यास्तव तंजाउरकर भले सज्जन व शौर्यवंतहीं आहेत त्यापासी जावेंतरी आपल्यास राखतील येक म्हणजे तेहीं राखूं सकनात कां म्हणजेन इस्तकविले पासून त्यासी सलूक राखिलों नाहीं. याखेरीज म्हराटाशी प्रमाण करून देऊन

अलों तेव्हांहीं तंजाउरावरी भांडणेच केलों करितां ते आपल्यास काय म्हणून राखतील. याखेरीज महमदल्लीखान् व इंग्रेजाचा स्नेह त्यास फार आहे. त्या नात्यानेंहीं आपल्यास राखीनात परंतु आपल्यास जीवंत महमदल्लीखानाशीं वोपीनासें तुमचे हातानें मारून सोडा ह्मणून त्यांस प्रार्थून येथें असून मदमल्लीखानाचे हातीं वोपीलेंजाण्यापेक्षां तंजावरकरांचे हातीं मारिलें जाणें बरें, ह्मणून दृढ निश्चय करून अर्धरात्रीं समयीं कोणासहीं न कळवितां एका घोड्यावर स्वार होऊन एक खिजमतदार बरोबर घेवून अति रहस्यकरून तंजावरचें लष्कर त्रिचनापल्लीस पूर्वेस कावेरीस दक्षिणेकडे उतरलें होतें. त्या लष्करांत येवून सरदार मानाजिरायास रहस्यें करून सांगून पाठविलें. तेव्हां मानाजिराव एकटेच पलीकडे जावून चंदासाहेबासीं भेटून बोलिले जे—तुह्मीं कां आलां. तुह्मांस राखणें अमच्यानें कोणतें विधें करूनहीं होणार नाहीं. महाराज प्रतापसिंव्हराजे साहेबासहीं तुमच्या ठांई राग फार आहे. करितां तुह्मांस आह्मीं राखूंसकना आतांहीं पाहिजे ते खचार्स देतों. तुह्मीं आपले फौजेंत जा. तेथें जाणें मनास येईनातर खर्चासहीं देतों बरोबरी मनुष्यहीं विश्वासुक देतों. आतांच येथून निघून जा दक्षिण प्रांती झाडी फार आहे तेथें जावून, तेथून पलीकडे जाणेस मन असल्यास जावुये. अथवा येथूनच वोडयारपाळेचें राणांत असून पलीकडे वेंटवल्लम त्रिणामलेचे झाडी दाठहोजाउये करितां तुह्मांसी सुचलेंते करा ह्मणाले. त्यास चंदासाहेबानी उत्तर दिलें जे— हा अर्थ समग्रहीं जाणून आले. तुह्मीं करावयाचा उपकार काय ह्मणजे महमदल्लीखानाच्या हातीं जीत वोपुनका तैशा प्रसंगांत तुमच्या मनुष्याकडून मारूंटाका येवढें अभय द्या ह्मणून मागीतले. तेंव्हां मानाजीरायांनी त्यास जीत वोपीत नाहीं ह्मणून भरवसा देऊन त्यासप्रत्येक स्थळ करून रहस्यानें व जतनाइनेहीं ठेवून त्याक्षणीं तंजावरास चालिले. पुर्वोत्तर समग्रहीं विस्तार करून लिहिले. त्यास प्रतापसिंव्ह महाराजानी वुत्तरदिलें जे या चंदासाहेबानें

केल्या कृत्यास त्याला अम्हीं राखिताच नये तत्रापि शरण आल्यावरी ते समग्र आठवास आणूनये. त्याला राखणेच विहित करितां त्या चंदासाहेबास तंजावरासपाठवा ह्मणून लिहिले तेंव्हां चंदासाहेब दृष्टीस आड झाला. तें वर्तमान नवाब महमदल्लीखानास कळून शोध घेतल्या ठायीं तिसरे दिवसीं तंजावरचे लष्करांत आहेते कळून तेंव्हां मानाजिरायास व महाराजासहीं प्रार्थना केली जे महाराजामुळें माझा जीव राहिला. महाराजानीं आस्रा दिल्या करितां वांचून पुनः माझ्या भाग्यास पावलों. त्या वेळेसही रासदमोहद्दीनखान व चंदासाहेब आले, तेंव्हांहीं माझा जोहार करून मला आस्रा देणार कोण धैर्यवंत होता. तैशा वेळेस महाराजानी मजमुळें आलाच पाहून घेतों ह्मणावें या धैर्याने मला आस्रा दिल्यामुळें मीं पुन्हः दवलतसा जाहलों. आतांही तैशीच दया करून माझा बापाचा दावा ध्यां धेइजेसें चंदासाहेबास मला द्यावें ह्मणून बहुता रीतीनें प्रार्थिले. याखेरीज नंदराज व मुरारजीघोरपडे यानीही चंदासाहेबास आपल्यापासी सोडून द्यावें ह्मणाले, तैसेंच इंग्रेज सरदारानीहो या चंदासाहेबास आपल्यापासी ओपावें ह्मणून कांहीं जोरानेहीं मागूंलागले. तेंव्हां मानाजीरायास व त्यासही चर्चा होवून जीत कदापी ओपिणार नाहीं ह्मणून चंदासाहेबास मारून सोडिले. सन् १७५२ इसवी जून माहे तारीक ३ रा. चंदासाहेबाचें डोसकें कापून नवाबाकडे पाठवून मानाजीराव तंजाउरास निघून आले. या अगोदरी तंजावुरची फौज कुमुकेस येताना सन १७५२ इसवी येप्रल् तारीख २१ स मानाजीराव यानी कोविलडीचे किल्ल्यांत फ्रांशीसाचे ठाणें होतेते उडऊन किल्ला स्वाधीन करून घेतले. तदनंतरें चंदासाहेबास डोसकें कापिल्या नंतरें नवाब महमदल्लीखानानी प्रतापसिंह महाराजाचे खैराती खर्चास ह्मणून यळंगाडाचा मुलूक लक्ष रुपयाचा व कोविलडिचा किल्लाहीं दिल्हे. तैसें विजयरघुनाथराय तोंडमानास प्रेषकषी माफ केले. नंदराज व मुरारजी घोरपडे

यानां त्रिचनापल्लीचीच आशा राहून नवाबाशी युद्धास प्रवर्तले तेंव्हांही. तंजाउरचे महाराजानी नवाबास कुमुक पाठविले. थोडे दिवस युद्ध जाहलें त्या युद्धांत नंदराजा कडील येक हती पळून तंजाउरास येवून पावला. व नंदराजाकडील येक तोंफ तंजाउरचे सरदारानी पडावू घेऊन आले. तदनंतरें नवाब महमदल्लीखानानी त्रिचनापल्ली किल्यांत इंग्रेजाचें ठाणे मजबूद ठेऊन आपण जरोरी चंरूपट्टणास थोडी इंग्रेजाची फौज घेऊन गेले. ते वर्तमान नंदराज मुरारजी घोरपढे यांस कळून आपल्यास दगा देऊन गेले ह्मणून मुरारजी घोरपडे यांचे भाऊ भुजंगराव व त्यांचे जावांई देखील थोडे स्वारानिशी पाठलाग करून, पन्निरट्टि तिर्वादीकडे गांठून,, नवाबाचे पालखीवरी हल्ला केले. तेंव्हां, नवाबा कडील लोकानी बंदुका बार केल्यांत मुरारजी यांचे भाऊ व जावांई देखील ठार जाहले. नवाब फलीकडे निघून गेले. पलीकडे गेले हे वर्तमान मुरार रायांस कळतांच केवळ विमनस्क होऊन मुरारराव आपले फौजेनिशी आपले स्वस्थळास निघून गेले. नंदराज उभय कावेरीतीर आक्रमून कित्येक दिवस जंबुकेश्वर प्रांतीं असून तदनंतरें आपले श्रीरंगपट्टणास जावून पावले. तदनंतरें प्रतापसिंह महाराजानी आपले पुत्र तुळजा महाराजांस माहाडीकाचीलेंके राजकुमरांबाईसाहेबास दुसरें लग्न करून दिल्हें. सवेंच सहा चार महिन्यात मोहित्याची लेंके मोहनबाईसाहेबास घेऊन तुळजा राजास तिसरें लग्न करून दिल्हे. याउपरी महाराजानी आपले फौजदार मानाजीरायांस दक्षिण प्रांतास पाठविणेस एक कारण जाहले. ते काय ह्मणजें रामनाथपुरचे जमीनदार मरवर महाराजाचे आश्रयांत केंव्हांहीं असणार; तरी हीं, नूतन धाकुटे वयस्थांस अधिपत्य प्राप्त जाहल्यामुळें आपल्या यौवन मदें करून कांही कुमुकहीं मिळवून घेऊन नवाब महमदल्लीखानाचा आश्रय दृढ ह्मणून समजून दक्षिणप्रांत महाराजाच्या मुलुकांत थोडी दुष्ट चर्या आरंभिला. येक दोन वेळेस महाराजानी क्षमा करूनहीं

पाहिले. तदनंतरें त्यांत नवाबाचे कृतृमहीं थोडें आहें ते जाणून दक्षिण-प्रांत तिरवाडनिरीचा मुलूक कधींहिं तंजाउर संस्थानासी मिळालातो; महाराज रामेश्वर यात्रेस गेले वेळेस रामनाथपुरचें अधिपत्य करणार मरवर वडील होता त्याने महाराजाची सेवा फार करून आर्जविल्यामुळें तो तिरवाडनिरिचा मुलूक त्याचे दाक्षण्यास्तव थोडे दिवस त्याला सोडिले होते. त्यास त्याचाच ल्योंक मरवराने नवाबाच्या कृतृपास वश्य होऊन महाराजाचे मुलुकांत दुष्ट चेष्टेस प्रवर्तल्या करितां फौज व फौजदारांस पाठविणेस कारण जाहलें. तेंव्हां, मानाजीराव् फौजेनिशी जावून लढाई करून प्रथम • हनुमंत गडाचा किल्ला, व वरूरचा किल्ला, व मंगळ गडाचा किल्ला, व कुवटीचा किल्ला, हे चारीहीं हल्ला करून घेऊन, तिरवाड-नीरीचा मुलुकहीं जमा करून जास्ती अर्मुख कोटचा किल्यावर शहा देऊन युद्ध केले तेंव्हां रामनाथपुरच्यानी बकुध्रा किल्ल्यावरूनहीं तंजावरांतून महाराजानी अन्यत्र कार्यास्तव अर्मुख कोटचा किल्ला सोडून येणे ह्मणून मानाजीरायास लिहिल्या करितां मानाजीरायानी आर्मुखकोट नव्होतां तिरवाडनिरीच्या मुलुकास व साधिल्या किल्ल्यास ठाणी ठेउन तंजाउरास महाराजाकडे येऊन पावले. त्या संधींत नवाब महमदल्लीखानास हे वर्तमान कळून महाराजासीं जबाब स्वाल करिणेंसें युक्त नाहीं करितां सन् १७६२ इसवींत इंग्रेजाचे सरदार मेस्तर आप्री ह्मणणारास कागद लिहिलें जे—त्रिचनापल्लीचे इलाखेंत असावयाचे मरवराचे मुलुकांत महाराजानी हनुमंतगड वगैरे किल्ले सात घेतले. ते नव्हतां हनुमंतगुडीचे कुसुकेस करनल्क्रियू ह्मणणारानी करनल् हरनानाता निशान लिहून येक इंग्रेजी निशान पाठविले होते. ते घेऊन हनुमंतगुडीच्या किल्ल्यांत जाऊन होते. त्यानी महाराजास उदंडरीतीने सांगीतले. ते ऐकनासें हनुमंतगुडी किल्लाहीं हल्ला करून घेऊन करनल् क्रियूकडे होतेते इंग्रेजी • निशानहीं फाडिले ह्मणून लिहिले. ते वर्तमानहीं

महाराजांस अवगत जाहलें. तदनंतर कित्येक दिवसाने पुदुच्चेरी बंदरास गवनरमेंटच्चे अधिकारास मुसे लाली ह्मणणार सरदार आला. त्यानें पूर्ती परिशोध न घेतां अकर्णीकें कडून तंजाउरच्चे राज्यावरी युद्धास आले. तंजाउरच्चे राजानी तुमचे येण्यास प्रसक्ती काय ह्मणून विचारिल्यां सदुत्तर न देतां येऊन तंजाउरच्या किल्ल्यास वेढा देऊन उत्तरले तेंव्हां प्रतापसिंह महाराजानी दोन महिने पावेतो तो किल्ला भांडवून शेवटी आपली फौज बाहेर काहडून मुसे लालीचे लष्करावरी रतावा पडून, बहुत सोलंदाज वगैरे कित्त्येक सरदारासहीं मारून, व कित्त्येक फौज मुलुकावरी पाठवून, त्याचे लष्करास येक दाणा, रस्त, येवूंदेईनासें बंद केले होते: तेणेकडून मुसे मजकूर घाबरें होऊन, भारी तोफा व भारी सरंजाम जडगीर कित्त्येक टाकून देऊन, अधाद त्वरेनें मजल दरमजल करून पुदुच्चेरीस पावले. तेंव्हां महाराजानी आपल्या मुलुकास तमाम आज्ञा दिले जे--या संस्तानांत परंपरेपासून चालत आला दंडक या मुलुकांत फरंगी मनुष्य कोणी आल्याने त्यास त्या त्या ठाईचे जकातींत हसल ध्यावें, याची पद्धती फरंगी सरदार चालत येणारास आसामी येकास पांच होन्न प्रमाणें, व घोड्यावरी बसून येणा-यास त्यास अधीक, फरंगी लोक पालखींत बसून आल्याने त्यांस विशेष हसल, आणी कांहीं फौज देऊन कोणी फरंगी सरदार आलियां त्याने अगावू महाराजास सांगून पाठवणें ; महाराजानी जगातीवाल्यांस हसल माफास परवानगी पाठवून निरोप देणे ; येणेप्रमाणे पुरातन चालत आल्या दंडकास हलींबंदरचे फरंगी कित्त्येकासी संस्थानास स्नेह विशेष जाहल्यामुळें, या उपरी निरंतर त्या लोकाचा येव होत जाईल. त्यांतही फौजेनिशी येणार आह्मास कळवूनच येतील ; त्या खेरीज येणार फरंगी अनेक कोणत्या बंदरांतून कोण्या रीती आल्याहीं त्या कोणास आह्मापासून हसल माफ केला असें घेणें गरजनाहीं ह्मणून आज्ञापिले. तदनंतरें पुदुच्चेरीचे गवर्नर व

जनूरलहीं चंन्नपटणचे किलयास मोर्चे लाविले तेंव्हां, चंन्नपट्टणचे गवर्नर यानी महाराज चंदासाहेबाचा कलाप पडिल्या पासूनहीं व नवाबास महाराजानी केल्या उपकारास्तवहीं महाराजाशीं विशेष स्नेह राखिला होता करीतां महाराजास कुमुक पाठवावी ह्मणून लिहिले. तेंव्हां महाराजानी महमद इसूपखान् कुंमंदान् त्रिचनापल्लीतून जाणाराबरोबरी चारी पांचशे स्वार वगैरे कुमुक पाठविले. त्या महाराजाकडील कुमुकेच्या फौजेनी चंन्नपट्टणावरी उतरल्या मुसेलालीचा लष्करास कोणती रस्ताहीं येऊंदेईनासे व फौजहीं येऊंदेईनासे बहुत मारामारी करून वाट बंद केले. त्यावरी मुसेलालीचा फौजेचा निर्वाह नाहींसें मुसेलाली पुदुचेरीस येऊन पावला. दुसरा किता पिकट साहेब कारक्यालावरी येऊन उतरले. तेंव्हां महाराजाचा कुमुक अपेक्षिले. तेंव्हांहीं महाराजानी कुमुक पाठवून साहाय केले. तदनंतरें तिसरा किता पिकेट साहेब पुदुचेरीचे किल्यावरी जाऊन उतरून लढाई केले. तेंव्हांहीं महाराजाची कुमुक अपेक्षिले. तेंव्हांही महाराजानी भारी कुमुक पाठवून सहाय केले. येणेप्रमाणे तीनी कित्तेसहीं इंग्रेजाचे खांस राज कारणास महाराजानी कुमुक करून साह्य केल्या करितां पिकटसाहेब फार संतोष पावून आपण विलायतीस जाल्या अगोदरी मेस्तर डुष्ळिकेस ह्मणणार सर्दारास महाराजाकडें पाठवून महा-राज व इंग्रेजाचे स्नेहातें पुरोवृद्धीस येकलहीं केले. तदनंतरें मानाजी राव् जगताफ यांस सरखेली व फौजदारी चालत होती परंतू मानाजी रायांची चलंती कोणतें योग्यतेसहीं युक्त नव्हते करितां मारून टाकावें तरी माफ व येक दोघांस त्यांच्या अकृत्यास्तव मारिले. तरींहीं मारावे ह्मणा-वयाचे महाराजाच्या चित्तीं नव्हतें करितां मानाजीरायास न मारितां सरखेलचे पदमात्र काहडून ब्राह्मणाची जात कोणत्या कृत्रिमासहीं धजणार नव्हे. आणि भिवून. बुध्दीने वर्तुणूक करतील ह्मणावयाचे निश्चये करून सकळ राज्य तंत्रहीं डबीर नारोपंताचे स्वाधीन करून शेवटोरहीं चालवीत

आले. तदनंतरें, नवाब महमदल्लीखान् त्रिचनापल्लींत येऊन असून तंजाउरचे महाराजासी प्रेषकषीचा जबाब सवाल केले. तेंव्हां महाराजानी सांगून पाठविल्या उत्तरास नवाबाचें उत्तर ताळापडनासें महाराजानी फौज सन्नद्ध करून युद्धास सिद्ध जाहले. तेंव्हां इंग्रेज सरकारच्या सरदारानी महाराजानी नवाबास केला उपकार आणि आपल्यासी राखिला विवहीं मनास आणून नवाबासहीं मागावयाच्या रीतीचे सांगून आपल्या मध्यस्तीने मागील राहिलें प्रेषकषीस येक हद्द करून या उपरि प्रति वर्षींहीं द्यावयाची प्रेषकषी इंग्रेज सरकारचे मारफतीने देणें ह्मणून वारून उभयतांस बूदलूचें स्तलांत भेटीचे संविधान करून समाधान केले. त्या दिवसांत लेंक तुळजा महाराजास दुसरी स्त्री राजकुमार बाईसाहेबाचे उदरी येक कन्या जन्मली. पेसजी मृत झाहल्या बाई शाहजीराजा ह्मणणार वांचला आहे ह्मणून कुप्पीं बटकीचा लेंक सुभान्यास तंजाउरचें राज्य प्राप्त व्हावयाजोगें केल्या कोथाजी घांटका उघडून गेला तो अरियलूचें रानांत येक्या खेड्यांत आलाहे ह्मणावयाचें महाराजास कळून दोघे विश्वासुक आप्त शिपाई त्या बरोबरी कित्येकांसहीं देऊन पाठवून त्या कोथाजी घांटक्यास मारून टाकिले. येणे प्रमाणे प्रतापसिंह महाराजानी राज्य करण्यांत उत्तम पुण्य कीर्ति विस्तारली. त्याचा विस्तार थोडा जाणवितों जे—उत्तरदेश सातार, पुना, अवरंगाबाद पावेतोहीं व पूर्व दिशेस समुद्र मध्य प्रदेश अच्चि, याळपाण, खंडीदेश, शिंगरद्वीप पावेतोहीं दक्षिण प्रदेश, मलयाळ, कोळंब, कोची गिडडाघाली, श्रीरंगपट्टण देश, बुदलूर देश, गुत्ती, कृष्णातीर, पनाळगडा पावेतोहीं प्रतापसिंह महाराजाची उत्तमरीती, उत्तमचलंती, दानधर्महीं, धर्मकीर्तीहीं औदार्य, शौर्य परराज्य भयंकर इत्यादि कीर्ति पसरल्या. आणिस्वराज्याचे जन समग्रहीं महाराजाचे दानादि औदार्य गुणांकडूनहीं जनरंजक शक्तिकडूनहीं सकल उपजीविकेचे प्रजा समग्रहीं सुखावल्या ऐशा महाराजास परलोक

प्रयाण दिवस समीपल्याचे कित्त्येक चिन्हे दिसूं लागली. त्यांचा विस्तार थोडा जाणवितों—प्रथम निर्याणास सहा महिन्या अनोदरी पासून महाराजाची चित्तवृत्ती अतिशय कोपाविष्ट जाहली. त्यास येकच दृष्टांतर सांगतो जे—देवदर्शना निमित्त महाराजानी तिर्वाळूरची सवारी केली. तेंव्हां महाराजाचेच सेवकांत दोघे मराठे मावळे मागें राहिले. त्यानीं महाराजाचे सेवेस अभ्यंतर पडतेंकीं ह्मणून त्वरेनें स्वारींत मिळावें ह्मणून धांवत आल्या करितां त्यांचा अंगवात व त्यांचा पदसंघट्टन रोमा पासून उडाले रज या दोहींचाहीं स्पर्श महाराजाच्या अंगास जाहलेसें भासलें करितां मंहाराजानी याक्षणी त्या दोघांचाहीं शिरच्छेद करविले. त्यांस त्यांवरी शिरच्छेद करावेंयाजोगें गुना नव्हता करितां प्रपंचास समग्र आजतागाईत महाराजानी केल्या वर्तणुकेस हा विपरीत चिन्हसें भासलें. ऐशी आणखी कित्येक उग्र कृत्यहीं चालिलीं. याखेरीज दैवी दृष्टांत येक सबळ चालला तो काय ह्मणजें—महाराजाचा निर्याणास तीन महिने अगोदरी पासून रात्री काळी बारा घटिक्या नंतरें बावीस घटिका पावेतोहीं येक थोर ऐसा रोदन शब्द होणे. महाराज आदि कडून सकल लोकहीं हा शब्द किल्या बाहेर होतो ह्मणून पहावयास गेल्या ठाई, किल्यांत होणे किल्यांत पाहिल्यां बाहेर होत्या सारिखें असणें येणेप्रमाणे • तीन माहिने जाहलें. तदनंतरें, दिवान वाड्यास पश्चिमभागीं पेसजी नायड कूट राज्य केले त्याच्या हजारीवरील येक गोपुर होतें त्या गोपुराचें शिखर उत्तरची बाजूचें येका येकी खचून पडलें. इत्यादि दुःश्चिन्हे ह्मणून सकल प्रपंचांतहीं ह्मणूलागले. आणखी कित्त्येक दुश्चिन्हे लोकांच्या दृष्टीसहीं दिसूं लागली. त्यानंतरें, प्रतापसिंह महाराजानी आपल्या तपोबळें कडून व योगाभ्यासा कडूनहीं श्रीगुरु वाक्याच्या दृढाभ्यासा कडून आपले निर्याण नीट कळून घेउन परिपूर्तीचे दिवस आनंदेंकडून भोगीत असतां तुकोजी महाराजाचे परिगृहीत स्त्रियांपैकी झाले पुत्र समग्र मृत

जाहले. त्यांत नाना साहेबाचे पोटी मात्र येक पुत्र अपुसाहेब ह्मणगार राहिले ह्मणावयाचा अर्थ वरि लिहिला आहेकीं ते अपुसाहेब आपल्या राखीचे पोटीं झाली संतती येक लेंक नानासाहेब ह्मणणारास ठेऊन आपण देवगतीस पावले. त्या परलोक गत अपुसाहेबास उत्तर कृत्य दहा-रोजाचेंहीं करवून त्याचे बारावे दिवसीं प्रतापसिंह महराज आपले पुत्र तुळजाराजास उत्तम रीतीची वर्तणूक समग्रहीं सांगून हढभ्रझकडून शके १५८५ स्वभानु संवत्सरीं प्रतापसिंह महराज परमगतीस पावले. त्या समागमें त्याची तिसरी स्त्री यमुनाबाई साहेब, पांचवी स्त्री सुखवारबाई साहेब उभयतां बाईसाहेब अनुगमन केले. सेंच तुळजा महाराज तक्त-निशी जाहले. तेंव्हां नवाब महमदल्लीखानानि महाराजास मुबारकाची बस्त्रे व पत्रें व मुतरमुरुग ह्मणणार येक अपूर्व पांखरूं थोर दीड मनुष्य-प्रमाणा उंच त्याचे पांय उंठा सारिखे ऐसें पाखरू पाठविले. तदनंतरें तुळजामहाराजानी चार पांच वर्षे पावेतो आपले बडील प्रतापसिंह महा-राजाचे आज्ञे प्रमाणेच आपल्या योग्य परिवारांस यथायुक्त राखून नवाब महमदल्लीखानास संतोष व्हावयाजोगे त्यानी मघरेवरी कुमदीन् महमद् इसूपखानाबरी एक किता व हैदरनायकावरी बेंगळूर पावेतो एक किता नवाबांनी राज कारण केले. त्यास येकंदर कुमुकेस फौज वगैरे व सरदार अरुणगिरि अप्पास मघरेचे कुमुकेस, बेंकटराव गाड्यास हैदराचे मुलुकावरी कुमुकेस पाठवून इतर राजे व नवाब आदी करून सर्वत्रानी श्लाघना करावयाजोगें राज्यपरिपालन करिते जाहले. तदनंतरें, पूर्वीपासून आपल्या अनुसरणेंत होते त्यांस दौलतवंत करावे ह्मणावयाचे अपेक्षेनें हुसेन् ह्मणणार येका तुरुकास आपले आमात्यपद दिल्हे. तेंव्हां आर्काड प्रांतावरी हैदरल्लीखानाची मोहिम जाहली होती ते हैदरल्लीखान् तंजाउरासमीप तिरुमलवाडीस येऊन महाराजासीं जवाब स्वाल केले. महाराजानी चार हत्ती व लाखहोन्न पावतो दिले ते घेऊन गेले. त्या हुसेन्खानखुर

ह्मणणाराने वरकड राज्य कारभार कोण्यारीती केल्यांहीं मुख्यकाम प्रतापसिंह महाराजानी केला घट्ट नवाब महमदल्लीखानास आर्काड सुभा याची प्रेषकषी तंजाउर संस्थानांतन प्रतिवर्षींहीं देत येण्याची इंग्रेज सर्कारचे मार्फतीनें देतयेण्याचे केले होते. तो घट्ट ह्मणावयाचा बाधा हुसेनूखान् सुराच्या विपरीत बुद्धिउदकाचे प्रवाहाने उखळिला करितां त्या आधारावरी होत्या संस्थानास धोका येईल अथवा आला ह्मणावयास संदेह नाहींसा जाहाला. तदनंतरें, तुळजामहाराजानी आपल्या अंकितलोकांचे बुद्धीस अनुसरून अस्तकबिल तुकोजी महाराजाचे दिवसापासून रामनाथपुरचे पाळेगारांस सहाय संपती करावयाची चाले संस्थानांत आहे ह्मणावयाचे आधारावरून व याखेरीज नागपट्टण बंदराने महाराजास प्रेषकषी द्यावयाचे हत्ती जहाजावर येतहोता ते जहाज रामनाथपुरचे तालच्या कांठास लागला ह्मणून रामनाथपुरच्यानी तो हत्ती काहडून घेऊन तो हत्ती महाराजाचा ह्मणून कळूनहीं न देतां ठेऊन घेतिल्याकरितां महाराज रोषोत्कर्षित पावून, रामनाथपुरावरी चालकरून, तो किल्ला वेढून, युद्धकरून किल्लाहीं पावून, तो किल्ला हस्तगत होते समयीं तुळजा महाराजानी युक्तायुक्त प्रसक्ती व अप्रसक्तीचे तजवीजेंत मनेंप्रेरून रामनाथपुरचा किल्ला न घेतां, त्यांचा त्यांस राखून त्याकडून आपल्या फौजेची बर्तवन ह्मणून कांहीं घेऊन, तंजाउरास पावून सेंवच आपली कन्या घांटवयास देऊन बहुत सन्नाहानिशी बहुत खर्च करून लग्न केले. त्या येकंदर खर्चामुळें नवाबास द्यावयाची प्रेषकषी दोन वर्षाची बाकी राहिली. तेंव्हां नवाब महमदल्लीखानानी तजवीज केली जे—तंजावरचे तुळजाराजे बुद्धिवंत आणि प्रबळहीं, उत्तरेकडील ह्मराट्याचे अनुसधानाचेहीं आणि प्रथम वयस्थ शूर जाहल्या करितां कधीहीं आपुले योग्यतेनुसार प्रवर्ततील. तेंव्हां आह्मासहीं जड होईल यास्तव कोणे रीतीहीं ह्यांस हाताखाले घ्यावें, यास प्रस्तुत प्रेषकषीची बाकीहीं आहे याची मागणी करितांच फौज जमाकरावी प्रसंगानुसार तंजाउरचे राज्य आक्रमून राजासहीं वश्यास आणावे कदाचित् त्यानी

प्रेषकशी देऊन सोडिल्यांहीं क्रमेंकरून राज्य आक्रमून राजास आपले हाताखाले ठेवणेचें कार्य परंतू वेगळी योचना कामाची नाहीं ह्मणून निश्चय करून प्रेषकशीची मागणें केले. तेंव्हां काल वशांत राजाची बुद्धी दुर्मंत्रीयानी अपहरून निराकरण उत्तर लिहितेंसें केले. तेवढ्याने नवाब महमदल्लीखान, राजाचे वडीलांनी केला उपकार न आठवितां राज्य तंजावरीच दृष्टी देऊन राज्य आक्रमणेचे बुद्धीने आपुले जेष्ट पुत्र उमदतुलाउम्रा या बरोबरी फौज व युद्ध सन्नाहहीं देऊन युद्धास पाठविले. त्यानी तंजाउरचा किला वेढून युद्धकेले. तेंव्हां ज्या दुर्मंत्रीनी गजाची बुद्धी चोरून युद्धास प्रवर्तविलेकीं त्यांस युद्ध सामर्थ्यहीं पुरनासें, पुढिले योचनेसहीं मंदत्व पावून संविधान करावेंह्मणून राजास विनवूं लागले. तेंव्हां राजानी योचना करून पुरातन वडिलाचे वेळेचे सामादिक येक दोघांसी तजवीज करून संविधान बोलून फौजेचा खर्च पंन्नास साठ लाख रुपये पावेतो वारून घेऊन कांहीं नग मालहीं दिल्हे. जातां वरकडास अर्धा मुलुकाचा महसूल ईड करून दिले. त्यानंतरें उमदतुल् उमरानी तंजावरच्या किल्ल्या समीप तीन कोसावरी पश्चिमेंकडे वल्लंचा किला आहे; त्यांत आपुले ठाणे ठेऊन येळंगाडचा मुलूक नवाबानींच दिलाहोता तो आपले स्वाधीन करून घेऊन आपली फौज घेऊन त्रिचनापल्लींस पावले. तदनंतरें महाराजानी चन्नपटणास नवाबाकडे आपल्याकडील सरदार एशवंतराव सूर्यवंशी ह्मणणारास पाठवून कित्येक संविधान सांगून पाठविले त्यास नवाबाचे मनोगत वेगळेंच कळवितां त्या सरदारा बरोबरी येक घोडा, वस्त्र, पत्र, मात्र पाठविले. परंतू संधी समाधान केले नाहीत. तदनंतरें नवाबानी अपले बाकीचे रुपये समग्र झाल्यानिशी पावतें झाल्यावरी येक वर्षानंतरें तुळजा महाराजास ऐवज समग्र नवाबास पावल्या कस्तिां फौजेच्या देणेस तुटारा पडल्या समयीं त्या लोकांस समग्रहीं लांच देऊन फोडून त्यानी भांडण्यास फित्वा करून कित्येक सर्दारांसहीं फित्व्यांने भेद करून राज्यच आक्रमावें ह्मणावयाचें योचनेने त्या वेळेस मराठ्याकडील येक सरदार

माधवरावसदाशिव ह्मणणार चन्नपट्टणास नवाबाकडे चौथाईस्तव आले. त्यास आपले करून घेऊन त्याचे मन्नहीं घेवून राज्य आक्रमणेस आपले दुसरेलेंक मदारमुलुक ह्मणणारास अधिकार देऊन फौजेनिशी अकार्णिक कडून पाठविले. त्यानी तंजाउरास पावून कांहीं युद्ध कांहीं कृतृमाचे बलाने तंजाउरचा किल्ला व राज्यहीं आक्रमून घेऊन किल्ल्यांत अपली ठाणी ठेऊन राज्याचा अधिकार समग्रहीं महाराजाचे पुरातन सेवक डबीर नारोपंताचे स्वाधीन करून आपण कित्येक दिवस कुंभकोणांत असून त्यानंतर निघून चन्नपट्टणास नवाब महमदल्लीखानाकडे जाऊन पावले. येणेप्रमाणे नवाबास तंजावुर राज्य दोन वर्षे अधिकार चालिला. तंजावुर राज्य शंभू महाराजापासून भोंसल वंशास चालत आल्यांत वरकड फौजेचा विचार कैसा असल्यांहीं राजाचे आप्त परिवार मात्र युद्धास प्रवर्तल्यां बहुत सेनेचा नाश करूं सकतील ऐसें असतां हा किल्ला अन्याक्रांत जाहलाकीं ह्मणून ह्मणावें तरीं सकलजनानेंहीं येक दोष आरोपण करावयास ठाव जाहला तो काय ह्मणजे—तुळजा महाराजास राज्यपद प्राप्त जाहल्या पासून बहुत दान धर्म केले. बहुत अग्रहारें दान केले. बहुत देवालयाचा उद्धार केला. तूरुकाचे मताच्यांस देखील अनेक धर्मे ऊर्जित कडून केले. स्वतेव राजे बुद्धिवंत सकल विद्याहीं जाणणारा आंगेकडून चांगले शूरहीं ऐशा महाराजास राज्यपद प्राप्तीनंतरें, चार वर्षा उपरी दुष्ट सामादिकांचे सहवास घडत आल्यामुळें, त्यांच्या विपरीत बुद्धीस महाराजाचे चित्तहीं थोडे अनुसरावेयास अंगीकारिल्या करितां त्या दुष्ट सामादिकांकडून कित्येक दुःष्कृत्ये महाराजास कळून न कळनहीं घडत आली. त्यांत लिंगोजी भोंसलेस प्रतिनामें गिलिबिलि अण्णा ह्मणणार येकास अमात्यपद प्राप्त जाहलें. त्या गिलिबिलिने राज्यांत त्याचा जिनस कळावयास प्रसक्ते पदारूढहोऊन असता ब्राह्मण जात देशस्थ आरणीकर कोनेर राव ह्मणणार येका जंमेदाराने आपल्या हक्कानिशी गिलिबिलि अण्णाशी आपल्या शीपाईगिरीच्या अंगेकडून जबाब सवाल केले. त्यांत

त्यांस राग आलासें कळून त्याकडील येकाने त्या कोनेर रायास अमर्यादेनें बोलूं लागला; तेणे करून उभयतांस चर्चा होऊन नग्न शस्त्रेंकरून मारामारी केली. त्यासमयीं सात पांच जनानी मिळून कोनेरराव ह्मणणार ब्राह्मणा वरी हात चालविल्या करितां, विशेष जखमा लागून ब्राह्मण खालता पडला परंतु त्या वेळेचा अवसर पाहतां ब्राह्मणावरी जबर जास्ती केले ह्मणावयास ठाव जाहला. हे वर्तमान महाराजास कळल्यावरी त्या ब्राह्मणास घरास पाठविले. असून त्याचा उपचारहीं केला असल्यां तो ब्राह्मण वांचो अथवा न वांचो शब्दास ठांव नसता; तैसें न होतां त्या गिलिबिलि अण्णाचे सांगण्यासच विश्वासून त्याच्या मनोगतानुसारच महाराजानी अंगीकारिल्या करितां त्या आरणीकर ब्राह्मणास जखमा लागूनहीं सजीव प्रज्ञेसहित असतांच पांयासी दोरी बांधून पंचम जातीकडूनहीं बिदींत ओढिले. तेंव्हां त्या ब्राह्मणाचे रक्त बिदींत समग्र पसरून तो ब्राह्मण फार दुखावला जाऊन दुःख सोसवनासें कित्येक दूर ओढिल्या नंतरें प्राण सोडिला. तेंव्हां सकलजनासहीं हे कृत्य परम कठोर ह्मणून बोलावेंयांस संदेह नाहीसा जाहला व राज्य नष्ट होण्यासहीं हेच कारण ह्मणून लोक वदंतीस थोर कारण जाहलें. तदनंतरें, नवाबानी तंजावुरचा किल्ला घेतला ते वर्तमान समग्रहीं इंग्रेज सरकाराचे सरदारानी विलायतीस कोर्टाफ् डैरेक्टर् वगैऱ्यांस लिहिले. त्या वरून इंग्रेज बादशहा आदिकडून थोर सरदारानी योचना केलि जे—केंव्हांहीं चन्नपटणाचे वर्तमान येण्यांत नवाब महमदली खानाची चलती व तंजावरची महाराजाची रीती ऐकत येण्यांत महाराजाकडून केंव्हांहीं नवाबास उपकारच घडत आला. परंतू येकेवेळेसहीं अनुपकार नाहीं. ऐसें असतां प्रथम नवाबानी प्रेषकषीचे अल्प कारणास्तव तंजाउरचे राज्यावरी फौज बंधीकरून आपले लेंकास पाठविले. त्यास राजानी प्रेषकषिसहित फौजेचा खर्च ह्मणून सांगीतल्या प्रमाणे येकंदर बहुत अधिक द्रव्य कबूल करून यानी येक किल्ला व भारी मुलूक बांधिला. तोहीं सोडून कबूल केल्याप्रमाणे ऐवजहीं

ह्याज्यानिशी पावतें केले असतां परतून नवाब महमदल्लीखानानी अकारणिक त्या राज्यावरी फौज पाठवून तंजाउरचें राज्य आक्रमिले. ते फार अनुचित केले. तंजाउरच्या राजानी हस्तकबिलें पासून केला उपकार समग्र नवाब विसरून कृतघ्न जाहले करितां, तंजाउरच्या राजानी उत्तम रीतीने नवाबासी व अमचा इंग्रेज सर्कारासहीं केल्या स्नेहास्तव याक्षणी तुह्मी चन्नपट्टणचे अधिकारास जाऊन नवाब महमदल्लीखानाकडून तें राज्य माधून घेऊन, तंजाउरचे तुळजा महाराजास देणे ह्मणून निश्चय करून निरोपून लाट पिकट साहेबास पाठविले. लाट पिकट साहेब चन्नपट्टणास पावून विलायतीचे कोर्ट अफ् डैरेक्टर्चे हुकुमाप्रमाणें नानाविध उपायाने नवाबाकडून तंजाउरचे राज्य घेऊन आपण तंजाउरचे किल्ल्यास पावून नवाबाकडील ठाणे होते ते उठवून तंजाउरचे राज्य व किल्लाही तुळजा महाराजास ओपून परतून तक्तनिशीने केले. तेंव्हां तुळजा महाराजानी इंग्रेज सर्कारचे थोरवीस व नीतीसहीं त्यानी दयेयुक्त केल्या उपकारास व भावाकडूनहीं वश्य होऊन इंग्रेज सर्काराचे न्यायेस मनेकडून पातेजावून तंजाउरची किल्ल्याची किल्लेदारी व फौजदारीहीं इंग्रेज सरकारास ओपून त्या फौजेच्या खर्चास अमुकें ह्मणून एक निष्कर्ष करून व इंग्रेज सरकारचे नजरेस लक्ष रुकज-याचा मुलूक व नागूर ह्मणावयाचा बंदरहीं आपले आप्त संतोषाने दिल्हे. त्या उपरी .नवाब महमदल्लीखानानी आपल्यास प्रतिवर्षासहीं प्रेषकषी यावी ह्मणून प्रयत्न केले. त्यास तुळजा महाराजानी आपला किल्ला नवाबानी अकारणीक कडून घेतला; तो नव्हतां, आपल्या वाड्यांतील परंपरा राजानी संपादून सव्वाशें वर्षापासून ठेविला होता तो माल समग्र घेऊन गेले. त्या मालाचे मोल प्रति वर्षासहीं हिशोब पाहिल्यां एक वर्षाचे व्याजांत दोन वर्षाचे प्रेषकषीस ऐवज होतो. या खेरीज आपण सर्व विधें कडूनहीं इंग्रेज सरकारासच उपकृत परंतु नवाबानी तर अवघे राज्यच घेतिले. या कारणास्तव आपण प्रेषकषी देतच नाहीं ह्मणून आपण जीवंत असतोर दिल्हे नाहीत. नीतिवंत ऐशा इंग्रेजा

करून महाराजास आपलेंच राज्यपद प्राप्ती नंतरे महाराजानी केली तजवीज काय ह्मणजें:- वर्णीसकर जातीचे व हीन वर्ण जातीच्यास समीपता व अमात्यपदहीं दिल्या करितां, ब्राह्मण हत्यादि पातकें, राज्य नष्ट होण्यासहीं कारण जाहलें. त्या उपरी उत्तम जाती ब्राह्मण जाहल्या करितां द्रोह करिनात. अगाध कृत्त्यासहीं भितील ह्मणून अपुलें अमात्यपद येकामागें येक ब्राह्मणासच शेवटोर चालविले. या उपरि, तुळजा महाराजानी आपण लग्न केल्या स्त्रियांपैकी मोहना बाईसाहेब ह्मणणार नवाब महमदल्लीखानानी किल्ला घेत्या-अघिलें वर्षि प्रसन्न होऊन पुत्र स ति देवगतीस पावले होते. उरल्या दोघ्या स्त्रियांपैकी राजसबाईसाहेब ज्येष्ट, राजकुमारबाईसाहेब दुसरे या दोघ्या स्त्रियांसहीं पुत्रसंतान नाहीं या उपरी होण्यासहीं होईल न होईल ह्मणावयाचा संदेह भासल्या करितां, पुत्रसंतानार्थ दोन लग्न केले. त्यांत एक स्त्री माहडीकाची कन्या सुलक्षणाबाईसाहेब ह्मणणार, दुसरी इंगळ्याची लेंके मोहनाबाईसाहेब ह्मणणार ऐशी दोन लग्न करून घेतले. त्यापैकी राहिल्या स्त्रिया चौघे. मोहनाबाईसाहेबाचे उदरीं प्रथम पुत्रसंतान होऊन दशदिवसांतच तो पुत्र देवगतीस पावला. तदनंतरें त्याच मोहनाबाईसाहेबाचे उदरी अब्दुल्प्रतापराम जन्मले. ते अब्दुल्प्रतापराजे सहावर्षे वाहडून शेवट देवी दाखवून त्या उपद्रवाने परलोक गतीस पावले. या खेरीज राजाचे दुसऱ्या स्त्रीचे पोटीं एक कन्या जाहली. तीतें आठवर्षास लग्नकरून दिल्हे ह्मणावयाचा अथ वरी लिहिला आहे; कीं त्या लेंकीच्या पोटीं येक पुत्र मारुतसामी ह्मणून, येक कन्या शांता ह्मणून ऐशी दोन लेंकरें जाहली. त्या दोघे लेंकरास टेऊन राजाची लेंके अपरूप बाईसाहेब ह्मणणार देवगतीस पावले होते. त्या दोघे लेंकरासहीं तुळजामाहाराजच मातृकृपेकडून संरक्षीत होते. दैवयोगें कडून ते दोघे लेंकेंहीं अब्दुलप्रतापरामराजे दैवगतीस पावले वर्षांतच नातुडे मारुतीसामी व शांतमाहीं दैवगतीस पावले. येणेप्रमाणे लेंक, लेंकी, नातुंडेंहीं आपल्या समोर दैवगतीस पावल्या करितां, तुळजामहाराजास

आपलेंहीं शरीर त्याग जाहल्यांच दुःख शमन या विना दुसरा मनास उपाय नाहीं ह्मणून बहुत व्यसनानें अधिक वैराग्यें करून अन्नोदकाची चाड देखील न राखितां काल क्रमूं लागले. तेणेकरून शरीरास महद्रोग उद्भवून त्या रोगानेच तीन वर्षें काल क्रमिले. ऐसें असतां नवाब हैदरल्लीखान ह्मणणार आर्काड चन्नपट्टण प्रांतावरी मोहिमेस आला तो तंजाउर किल्ल्याकडे येऊन उतरून गोळेमारून किल्ल्यांत इंग्रेजाची फौज होती त्यासहीं लढाई करून तंजाउरचा मुलुक समग्र जप्ती केला, त्या दिवसात तंजाउर देशाचे व किल्ल्यांनहीं केवल क्षाम पडून दाणा मिळेना, अशा समयीं, सकळ जन क्षोभहीं होऊन रोजगार बहुत मनुष्य मरूं लागली. सहाशें, सातशें, येणेप्रमाणें जाऊं लागले. तेंव्हां त्या क्षामांत निर्वाह नाहींसें शेवट मनुष्यास मनुष्याने भक्षिले. तेंव्हाड्याने क्षाम व कलाप दोनी वारून गेला. तदनंतरें, आपुले शरीर या उपरी राहीना ह्मणावयाचे निश्चयेकरून कळल्या वरी योचना केले जे—आपल्यास जाहले पुत्र व नातुंडेहीं आपल्या पुढेंच परलोकगतीस पावले; सांपत आपले शरीरहीं राहीना, आपल्या उत्तर क्रियेसहीं व राज्य परिपालनेसहीं कोणी योग्य बाध्य नाहीं, करितां पुत्र पाहिजेतरी आपले वडिल केवळ राजऋषी प्रमाणें बहुत कीर्ती संपादून सकळ सोयरे लोकानीहीं त्यांचे योग्यतेस वश्य होऊन त्यांचा अंगिकार करून आपण होऊन मिळावयाजोगे वर्तणूक केले, तरीहीं तुकोजीराजाचे लग्नकरीनाने बाइकाचे पोटी जन्मले ह्मणावयाचे येक कळंक राहूनच गेला असतां तशा कोणत्या शब्दासहीं ठांव न राहतां अपले स्वकुलांत स्वगोत्रीच व दाइजापैकी रूप गुणेंकरून युक्त ऐसा मुलास विधीयुक्त दत्त घेऊन जातकर्महीं संस्कारहीं करून शरफोजीराजे ह्मणून नामकर्ण केले. आतां ते शरफोजीराजे कोणाच्या वंशातले ह्मणून कळण्यास लिहितों जे— भोंसल वंशांत आदि पुरुष शंभुराजा पासून तेरावे पुरुष बाबाजीराजे; यांचे पोटी मालोजी राजे येक, विठोजीराजे येक, दोघे जन्मले ह्मणूनहीं मालोजी राजांचे पोटी शाहजीराजे जाहले. त्या शाहजीराजाच्या पोटी शिवाजीराजे

येकोजीराजे जन्मले. त्यांची ख्याती लिहून दुसरे पुत्र विठोजीराजाची ख्यातीहीं कित्येक लिहून त्या विठोजीराजाची संततीच आतां सातार्‍यान्त राज्यकरणारहीं व पणाळांत राज्य करणारहीं ह्मणावयाचा अर्थ येकंतर विस्तारें करून वरी लिहिला आहे. सांप्रत तुळजाराजानी दत्त घेतले शरफोजीराजे त्या विठोजी राजाचे वंशाचेच जाहल्या करितां तो विस्तार जाणवितों जे-विठोजी-राजाचे लेंक आठजणांपैकीं शेवटील लेंक त्र्यंबकजीराजास जाहल्या लेंकां पैकी गंगाजीराजे ह्मणून येक लेंक. त्या गंगाजीराजास उवाजीराजे येक, तावोजीराजे येक ऐसे दोघे लेंक. त्या तावोजी राजाची संतती प्रसंगानुसार लिहिलें जाईल. प्रस्तुत त्या उवाजी राजाचा लेंक गंगाजीराजे, त्या गंगाजीराजाचा लेंक सुभा-नजीराजे त्य सुभानजीराजाच्या पोटीं उवाजीराजे ह्मणून येक व शाहजीराजे ह्मणून येक ऐशे दोघे लेंक. त्या पैकी शाहजीराजाच्या पोटी जन्मलेतेच शरफो-जीराजे; त्यास तुळजा महाराजानी उत्तम वंश करितां, उत्तमरीतीने विहित प्रकारें शास्त्रास अनुसरून विधियुक्त दत्त घेऊन हत्तीवरी नौबतेंनिशी गावांत समग्र साखर वांटून, सकल सोइर्‍यासहीं जेवणें करवून, त्यावेळेस हानरबिल् इंग्रज कुंपणीचे सरदार तंजाउरचे किल्ल्यांत होते ते मेस्तर जान् हडालेष्टन् रिसिडेंट व मेस्तर इपसली, मेस्तर व करणल्, मेस्तर व ऊष्टोट कमांडर व मेस्तर स्वार्च पादरी या चौघाचे हातीहीं या शरफोजी राजास या राज्याची सहज बाध्यता असतांहीं न्यायशास्त्राप्रकारें अशी दत्त घेतलें आहे. अमच्या राज्यास व भाग्यास व वंशासहीं हेच अधिपती यास तुमच्या हाती वोपितों आह्मा माघार या शरफोजीराजा कडूनच राज्यतंत्र चालवून सर्वविध अभिमाने करून याचें संरक्षणा करावें ह्मणून या चौघे सरदाराचे हाती शरफोजीराजास ओपून दिल्हे. सवेंच चौथे पांचवे दिवशी वसंत पंचमीच्या उत्तम मुहूर्तांत श्रीप्रताप रामस्वामीचे महालांत सदर करून राजासन घालवून त्या आसनावरी शरफोजी महाराजास बसवून सकळ सामादिकांकडूनहीं राजवत राजसन्मान करून आपण निश्चित जाहले. व चन्नपट्टणाचे गौनरमेंटासहीं चालिला

अर्थ समग्रहीं व्यक्त लिहून पाठविले. तैसें जाहल्यास दुष्ट सामादिकानी मिळून योचना केली जे–महाराजास निर्याण समय समीप उरला; महाराजानी आपले राज्यधर वंशधर हा उत्तम कुलांत जन्मल्या शरफोजीराजास राजे करून इंग्रेज सरदाराचें हाती ओपिल्या करितां, या उपरि महाराजाचे निर्याण होतांच इंग्रेज अभिमानास पडून शरफोजीराजास तक्तनिशी करऊन सर्व परामर्षासहीं आपण पुढें होतील तेंव्हां तुह्मा सर्वत्राचे जीवन बुडून जाईल अमचा कोणता मानहीं राहणार नाहीं या करितां राखीच्या समूहातील अमरसिंग येक आहेत किं ते राज्यभारास उणें जाइलेंतरीं वयाने प्रौढ आहेत करितां सर्व साहास करून बल बांधून त्याला पुढे करून आपण सकळहीं अनुभोगुये करितां महाराजा जीवंत असतांच अमरशिंगास रूपरूपबलाविजेसें करून अंकारोपण करून ठेवावे ह्मणावयाची विपरीत योचना दृढकरून येकमत होऊन तुळजा महाराजास मनोशक्ती केवळ जीर्ण जाहल्या समयीं महाराज बलावितातो ह्मणून अमरशिंगास रूपरूप आणून सोडून महाराजानी केली वारा वारी ह्मणून येक वदंती कल्पऊन चन्नपट्टणचे गौनरमेंटासहीं सांप्रत कल्पविल्या वदंतीस अनुसरून महाराजाचे नांवें लिहिल्या कागदास महाराजाचा शिखाहीं करवून तो कागद गौनरमेंटास पाठविला. सेवेंच दुसरें दिवसी शकें १७०८ पराभवसंवत्सरीं तुळजा महाराज परमपदास पावले. त्यांचे उत्तर कार्यास दुष्ट सामादिकाचे स्वाधीनतेच्या बळें कडून लौकीकार्थ शरफोजी राजासहीं जवळ ठेऊन घेऊन अमरशिंग आपणच पुढं होऊन शास्त्र मर्यादा पाहिनासें चालतें केले. तदनंतरें चन्नपट्टण गौनरमेंटास अधिकारी ऐशे शिराजबळ केमल यांस या दुष्ट सामादिकानिं आपण केली योचना शेखर पावणेस उपपत्ती जैसी की तदनुसार योचना करून लेडी केभलास जाणते करून त्यां कडून शिराजबळ केमलास बोधविले. शिराजबल केनलानी त्या बोधनेचा अंगीकार करून याविषयास बंगालचे गौनरमेंटास पर्याय कडून जैसें लिहावें कीं तैसें लिहून

निरोप आणवून घेऊन आपण तंजावुरास येऊन पावले. या अगोदरीच दुष्ट सामादीकानी तंजावुरांत असणार इंग्रेज सर्दारासहीं आपल्या स्वमतास अनसरून कोणत्या बोलण्यासहीं पुढें न होतां असावयाजोगें सांगून ठेविले होते. शिराजबल केमल तंजावुरास पावल्या नंतरें शरफोजीराजाकडील व अमरशिंगा कडिल्यां खेरीज मध्वस्थ असणारास विचारून कळून घेतो ह्मणावयाचा युक्त प्रकारें दाखवून मध्यस्थ बारा जण पंडित ह्मणून कधीहीं शास्त्रच न जाणते ऐशे दुष्ट सामादिकांपासून सोडिले त्यास मिळवून शास्त्ररीती येकीकडे ठेऊन लौकीक न्यायहीं कळना त्यास आपल्या संमतानुसार त्यांची साक्षी उभऊन ध्यावें यांजोगीं विचारणा करून बारा मध्यस्थीच्या सांगण्या वरूनच या राज्यास अमरशिंगच बाध्य ह्मणून शक १७०९ प्लवंगनाम संवत्सरी अमरशिंगास तंजावुर राज्याचे तक्तनिशी केले. त्यानंतरें अमरशिंग राजानी राज्यभार करणेंत निज बाध्य ऐशे शरफोजीराजास सहज बाध्यता असतांहीं तुळजामहाराजानी विहित रीतीने युक्तप्रकारें दत्त घेऊन कुंपनीसहीं निरविल्या करितां सर्व विधें करूनहीं बाध्य ऐशा शरफोजी राजास अमरशिंग यानी मत्सरें करून करावेंयाचा वुपद्रव सर्वहीं मेस्तर स्वार्च पादरी साहेबानी पूर्वापर शोधून पाहून, विचारणा केल्या ठांयीं शरफोजी राजाच्या निजबाने स्वार्च पादरी साहेबाचे दयेयुक्त अंतःकरणास बोढिलें याकरितां त्यानी हा अर्थ समग्रहीं इंग्रेज कुंपनीस जाणते केले. त्या संधींत कुंपनीचे तरफेने मेस्तर राम ह्मणणार सरदार तंजावुर रेसिडेंटीस आले. त्या मेस्तर राम ह्मणणार रेशिडेंटास मेस्तर स्वार्च पादरी साहेबानी कुंपनीस जाणविला अर्थ विलायतीस पावून तेथून कोर्ट अफ् डिरेक्टर्चे निरोपा प्रमाणे गौनरमेंटाच्यानी लिहिलें जे शरफोजीराजास अमरशिंग याचे निर्बंधा खेरिज करून ठेऊन त्यांचे संरक्षण करा ह्मणून त्यांस तेणे प्रमाणेच राजे मजकूरास वेघळें स्थळी दिवाण वाडयांतच ठेऊन रक्षणार्थ कुंपणीचे लोकहीं ठेऊन तदनंतरें, त्यानीं मेस्तर स्वार्चा करूनहीं कित्येक व तंजावुराचे पंडिता करूनहीं शरफोजीराजाची

बाध्यता कळून घेऊन प्रस्तुत शरफोजीराजास खर्चासहीं चालवें या वाटार्थ कुंपणीस जाणते केला तेहीं, इंग्रेज कुंपनीवाल्यानी मनास आणून शरफोजी-राजास व त्यांचे संसारासहीं विद्यमानानुसार खर्चासहीं करून ठेविले. त्यावरी शरफोजीराजानी वृथा काल जावू देयीनासें मेस्तर स्वार्चा कडून इंग्रेजी लिहिण्या बोलण्याचे अभ्यास स्वमन केले. तेंव्हां, मेस्तर स्वार्चे पादरीसाहेब यानी अंतःकरण पुरस्सर त्यांस करविले. तेणे कडून राजे मजकूर इंग्रेजीचा अभ्यास चांगल्या रीतीने केले. तैसेच स्वजाति लिफी महाराष्ट्र व बालबंदहीं अभ्यासिले. व अरवी लिपीहीं अभ्यासिले. तशामध्येहीं अमराशिंगानी प्रतिपदीहीं उपद्रवच करूं लागले. करितां सकळहीं मेस्तर स्वार्चास शरफोजी राजानी ओपिले. मेस्तर स्वार्चानी हे येकंदर मनास आणून कुंपनीस जाणविले. त्या वरून कुंपनीवाल्यानी शरफोजीराजे व त्यांचे मातोश्री या उभयतांचेहीं मनोगत कळून घेऊन तदनुसारच राजे मजकूर चन्नपट्टणास येणेस निरोप पाठविल्या सरिसेंच शरफोजीराजे व त्यांचे मातोश्री या उभयतानीहीं चन्नपट्टणास पावून कुंपनीच्या आश्रयांत राहिले. तेंव्हां समागमें आले ते मेस्तर स्वार्चे पादरी साहेब यानी मेस्तर जरीख पादरी साहेबास अपले कार्यास ठेऊन आपण तंजावूरास परतून आले. तेंव्हां कुंपनी वाल्यानी शरफोजीराजे व त्यांचे मातोश्री उभयतांसहीं आदरें मानकडून चालविले. त्यासरिसें शरफोजीराजे यांचे बाध्यस्त्येचीं विचारणा निर्मल करावी ह्मणून इच्छिल्यासमयीं शरफोजीराजे यांस त्याविषयीं तंजाउरच्या पंडितानी निष्कर्ष केला पुस्तक कुंपणीस दिल्हे. तेंव्हां कुंपनीवाल्यानी अमराशिंग यांस याविषयास विचारिल्यास अमराशिंग यानी त्यास विरोध लिहून दिल्हे. तोहीं घेऊन काशी वगैरे स्थळास पाठवून विचारणा करविली. शरफोजीराजे तंजाउरांतच अमरशिंगाच्या उपद्रवाविरहित स्थळांत जाऊन राहातेंं निरोपिले. राजेमजकूरहीं तदनुसार वर्तणूक केले. तेंव्हां मेस्तर स्वार्चसाहेबानी पेसजी अमरशिंग्यास शास्त्र न जाणतां

भयकडूनहीं, काहीं आशे कडूनही लटिक्या साक्षी दिल्या बारा पंडितां पैकीं मेले ते जातां, वरकड पंडितांनी आह्मी केलेंते अन्याय ह्मणून मेस्तर स्वार्च पादरी साहेबास सांगीतले. तो अर्थ मेस्तर स्वार्च साहेब गवर्नमेंटास लिहून पाठविला. तदनंतरें कित्येक दिवसांवरी मेस्तर स्वार्च साहेब दैवगतीस पावले. तेंव्हां शरफोजीराजास फार व्यसन जाहलें. परंतु त्या मेस्तर स्वार्च पादरी साहेबाचे स्थानास मेस्तर जनीफ पादरी साहेब आले. त्यानी राजे मजकूराचा विचार वर्तणूक चांगला कळून घेऊन पाहत आल्या करितां, त्या जनीक साहेबानीही राजाचेठायीं फार अंतःकरण करूं लागले. तेंव्हां त्या जनीक साहेबाचे स्नेहित मेस्तर् टूर्यन् साहेब ह्मणणार रेसिडेंटीस आल्याकरितां त्यांचे नीति व न्याययुक्त चलंतीहीं पाहात येण्यावरून प्रतिपदीहीं राजास ते व्यसन शमन पावण्यास कारण जाहलें. तदनंतरें इंग्रेजी कुंपनीवाल्यानी आपण करविल्या विचारणेंत सर्व विधेंकडूनहीं शरफोजी राजाची बाध्यता बलवंत ह्मणावयाचे जाणून तंजाउर रेशिडेंटीस मेस्तर इरियसन् साहेब यांसी निरोपून त्यांकडून प्रस्तुत अबाध्यतेकडून राज्य करणार अमरशिंगाने अका वर्षे चुंगडी दिवस राज्य केल्यांत रयतांसहीं सौख्य नाहीसें मुलुकांत रुजु मार्गे कडून पैका वसूल होणे नाहीसें वसूल जाहलं पैका रुजुमार्गीनें सर्कारासहीं पावनामुळें मुशारदारांना मुशाराहीं न पावतां बेसुमार कर्जहीं होऊन कित्येक जन स्वतां बेसुमार लटिके कतबेहीं होऊन ऐशे येकंदर येकहीं नीट नाहीसे अन्याय होऊन केवळ अमरतें कडूनच करित आले. ऐशा अमरशिंगास परतें करून सर्वविध कडूनहीं योग्यऐशे शरफोजी राजास शकें १७२० काळयुक्ती नाम संवत्सरीं तंजाउर राज्याचें तक्तनिशी केले. सर्वेच याविषयीं केल्या विचारणेचा मथितार्थाची ख्यातिपत्रें प्रचुर केले. तेणेकडून सकल जनासहीं इंग्रेज कुंपनीवाल्याचे प्रविहित विजारणेचाहीं व न्यायाचाहीं प्रकाश चांगल्या रीतीने कळून आले तदनंतरें शरफोजी राजानी अपले स्वराज्यपद प्राप्ती नंतरें, या अगोदरील

अमरशिंगाचे वेळेस चालिलें अन्याय समग्रहीं निरोधून विहित मार्गेंकरून अपले प्रजेसहीं विहित सौख्य देऊन आले. दप्तरें हिशेबासहीं येक पद्धती करून, राजग्रह समग्रहीं जंद होते तें डाराडूजी करून कित्येक नूतनेहीं करून युक्तप्रकारें राज्यभार करण्याचे दिवसांत कुंपनीचे फौज टिप्पूसुल्तान् याजवरी मोहिम केली. तेंव्हां, महाराजस रस्ते विषयीं जाणविल्यास महाराजानी आपले शक्तीस कांहीं अधिक व करवेल आहे त्या घोड्यापैकीं आपले बिरुदाचे व बसावेयाचे व रथाचे घोडें देखील देऊन व हत्ती इत्यादि देवून, कुंपनीच्यानी इच्छिले स्थलास पोंहचविले. सवेंच महाराजानी अपल्या समानकुलांत घांटक्याच्या लेंकी यमुनाबाईसाहेब ह्मणणार येक व अहिल्या बाईसाहेब ह्मणणार येक या उभयतां बाईसाहेबांसहीं लग्न करून घेतिले. तदनंतरे, पेसजी अमरसिंहाचे राज्यभारा शेवटी इंग्रेजी सरकारचे तरफेने होतेसे रेशिडेंट् मेस्तर मकलोठ् साहेब ह्मणणारानी महाराज तक्तनिशीं होयीनाते अगोदरी महाराजास निष्कर्ष पावल्या देण्यास तसा हा विल्यास जाहला आहे ह्मणून इंग्रेज सर्कारास जाणविल्या क्षणी महाराजाची बाकी पावती केला. त्यास त्या मकलोट साहेबानी जाणविली गोष्टी निजास पावली ह्मणावयाचा व याद लिहून दिल्हा. तो प्रस्तुत रेसिडेंट मेस्तर डुर्यन्‌साहेबाने महाराज साहेबास ओपिल्यावरून महाराजानी आपली निजाची वर्तणूक इंग्रेज सर्कारास व्यक्त होण्यास्तव महाराजानी विहित साक्षियुक्त रेशिडेंट मेस्तर डूयन्तु साहेबास सन् १८०० इसवी माहे मे २७ तारिखेस लिहिलें पत्र मेस्तर मजकूरानी पूर्वापर संदर्भ साक्षियुक्तहीं मनास आणून महाराजाचे निजत्व व महाराजाची बरवी वर्तणूकहीं व खरेंपणहीं इंग्रेज सर्कारास चांगल्या रीतीने जाणते केले. त्या वरून हानरबिल् कुंपनीवार-यानी ते पाहून महाराजाचे कार्यस्थास पाठविणे असें निरोपिले. तेव्हां महाराजानी दत्ताजी अप्पास व या अनुभोगांत असणार येक दोघांसहीं पाठविले. त्यास योग्यतेनें बलावून घेऊन विचारून. महाराजाचे निजत्वास

मानवले कुंपनीवाल्यानी अपल्या स्वजातीवरी दृष्टी देंयीनासारिखें शुद्ध न्यायावरच उभेराहून न्याय विस्तारविले. ते श्लाघना करावेंयास योग्य असे या रीतिच्या मकलोटास संकट काल प्राप्त जाहल्यासमयीं मकलोठानी त्याची बायका मिसूस्ट्रेस् मेकलोट ह्मणणारानीहीं संकटकालाचा विध जाणवून महाराजास प्रार्थिले. तेंव्हां महाराजानी पेशजी महाराजाच्या बाध्यतेचा मजकूर कित्येक मेकलोटानाहीं कुंपनीस कळविले होते. त्या उपकारास्तवहीं अपले थोरवी करितांहीं मिसूस्ट्रूस् मकलोट ह्मणणाराचे प्रार्थनेस्तवहीं प्रस्तुत मेकलोटानी केला अपकार देखील आठविनासें त्यास कांहीं अधीकच दहाहजार रुपये देववीले. त्यावेळेस मेस्तर स्वार्चानी या अनुभवांत होते ते मेस्तर तरीखपादरी साहेबास मेस्तर जसाख पादरीसाहेबासहीं नीट कळलें होतें. त्याकरितां त्या उभयतांचे निजबोलणें महाराजाचे निजत्वास केवळ प्रबळ साक्षी होऊन होत्या करितां महाराजानी त्या उभयतां पादरी साहेबाचे खरें बोलणेच्या उपकारास महाराज बद्ध जाहले. या अगोदरीच महाराजानी लग्नकेलेली दुसरी स्त्री सौ० अहल्या बाईसाहेब यांचे उदरीं कन्यारत्न जन्मले त्यास सुलक्षणा बाईसाहेब ह्मणून नाव ठेविले. तदनंतरें, इंग्रेजसर्कार तर्फेस अमरशिंग यानी केल्या राज्यभारांत तंजाउर देशाचे राज्यांत अन्याय चालिला आहे या करितां देश समग्र इंग्रेजसर्कारचे तरफेने केल्या यां चांगल्या रीतीने न्याय करितों ह्मणून महाराजास जाणविले. त्या न्याय करणेस महाराजानी अंगिकार करून आपला देश इंग्रेज सर्कारचे तरफेने ओपिले. इंग्रेजसर्कारच्यानी महाराजाचे निर्मल मनास व निर्मल वर्तणुकेसहीं मानून महाराजाचे किल्यांत इंग्रेजाचे ठाणे होते तेहीं काढून महाराजाचा किल्ला मोकळा करून दिल्हे. तेंव्हां महाराज इंग्रेज सर्कारांतहीं येक त्रीटी जाहली त्यांत कित्त्येक कामास मेस्तर टूरियन् साहेब सहायभूत असून महाराजास युक्त प्रकारें सुलभ केले. तदनंतरें इंग्रेज सर्कारच्यास दक्षिणप्रांती मरदा ह्मणणार पाळेगाराचे पारपत्त्य करणे जरूर पडल्यावेळेस महाराजास जाणविल्याक्षणी महाराजानी

आपश्च देह ओपिल्या वरहीं आपल्या संरक्षणार्थ थोडें सैन्य आहेत्यांतहीं शिवण्णा ह्मणणार सरदारा बरोबरी समरधीराचे स्वार पन्नास व मोगलायीस्वार वीस झुंजार व पादचार आपले समक्ष गाहगशारा ह्मणणार गलेफाचे बंदूकेचे देखीलानिशी महशदानशया इतुक्या फौजेसहीं खर्चास देखील आपणच देऊन रेशिडेंट मेस्तर ब्लाक्बरन् साहेबा बरोबरी कुमुकेस पाठविले (सन् १८०१ इसवी माहे जून तारीख ७-स) तदनंतरें, पेसजी महाराजानी आपलें लग्नहोइनात्या अगोदरीं येक स्त्री सर्वगुण कडून युक्त योग्य बाल्यवयी ऐशे स्त्रियेस परिग्रह केले होते. त्यानीहीं महाराजाचे चित्तानुरूप वर्तणूक करीत होते. तैशी स्त्री दोनदा गर्भ होऊन प्रसवही होऊन ते दोनी प्रजाहीं नष्ट जाहली. व दुसरे प्रसवा मध्येच ती स्त्रीहीं नष्ट जाहली करितां त्या स्त्रीचे गुणाधीक्ये कडून महाराजास ते येक व्यसनास्पदहीं जाहले. परंतू, त्या स्त्रियेने आपलें अवसान समयीं आपल्या नांवें येक चांगला धर्म अन्नछत्रादिक व्हांवें ह्मणून महाराजास विनविलें होतें. त्याचा अंगिकार करून महाराजानी उत्तम व उपयुक्त ऐशा शेतूमार्गांत छत्र व अग्रहार व देवालय व श्रृंगारवन व तटाक इत्यादिक होण्यास आरंभ करून त्या स्थलास मुक्तंबापुरछत्र ह्मणून नांवहीं ठेऊन चांगल्या रीतीने कामहीं चालतें केले. ते येकंदर त्याचे स्मरण सर्वदा करिणेस हेतुभूत आहे. तदनंतरें, महाराजानी तीर्थ यात्रेचा उद्देश करून चोळदेश समग्र येक किता, व श्रीरंग यात्रा येक कित्ता व गंगा यात्रा येक कित्ता, व पळणी यात्रा येक कित्ता, येणेप्रमाणे तीनी चार किते यात्रा केल्यांत रेशिडेंट मेस्तर ब्ल्याक्बरन् साहेब याने यात्रेंत समागमें येऊन त्या त्या स्थळीहीं वाटेंत प्रति मजलांतहीं महाराजाचे मनानुसार मर्यादा चालवीत आले. त्या वरून मेस्तर मजकूराचा उपकार महाराजानी फार मानिला. महाराज व इंग्रेज सर्कारास राजी केले. त्यांत महाराजास कुंपनीचे स्वाधीन देश जे थोरकी त्या देशांतहीं महाराजाचे स्वदेशा सारिखे उपचार करितों ह्मणून वाकदत्त केले होते. ते मेस्तर ब्लाक्बरन साहेबानी हद्द

केलें. आणखि येक उपकार मेस्तर ब्लाक्बरन् साहेबाचा महाराज मानितातित ते काय ह्मणजे महाराजानी आपला देश समग्र न्याय करिणेस्तव इंग्रेज सरकारास ओपिते वेळेस महाराज व इंग्रेज सरकारामध्ये जाहल्या रीटींत महाराजास उपयुक्त कार्य इंग्रेज सरकारानी अंगीकारायाजोगें केलें. ते नव्होतां त्यांच रीटीमध्ये इंग्रेजास अन्य देशावरी कलाप करण्याच्या समयीं हो अथवा इंग्रेजा वरी अन्यदेशाच्यानी कलाप करण्याच्या समयीं हो महाराजाच्या किल्ल्यांत इंग्रेज सरकाराचे ठाणे ठेवणें ह्मणून करार पावला होता त्यास तेणे प्रमाणेच इंग्रेज सरकारच्यास कलाप प्रसक्ती पडल्या वेळेस करारा प्रमाणें ठाणी ठेवणेस उद्युक्त जाहले. तेंव्हां मेस्तर मजकूरानी महाराजाची चलंती व महाराजाचे योग्यतेस व महाराजाचा विश्वास हे समग्रहीं कुंपनीस जाणता करून महाराजाच्या ठायीं कुंपनीस प्रिय होयसे हीं करून तो अर्थ राहता करविले. त्यावरून मेस्तर ब्लाक्बरन् साहेबाचा उपकार महाराज बहुत मानितातीं. तैसेंच मेस्तर टुरीयन् साहेबाचेरिसिडेंटींत मेस्तर मकूलोट साहेबाचें व्यवहारा विषयीं महाराजाना निजेकडून लिहिला अर्थ येकंदरहीं व महाराजाचे निजत्वहीं व साक्षीचे बलहीं कुंपनीस व्यक्त जाणतें केले. तो उपकार नव्हतां आपण विलायतीस गेल्यावरीहीं महाराजाचे ठायीं प्रीती करून महाराजास कित्येक पुस्तकें व भूगोळाचे पुस्तकें व रुप्याची बासनें व रुप्याच्या कित्येक चीजाहीं पाठविले त्या वरूननहीं मेस्तर टुरियन् साहेबाचा उपकार महाराज प्रतिपदीहीं मानितातित. या पळनी स्वारी अगोदरीच पेसजी महाराजास प्रथम कन्या जाहली. सौभाग्यवती अहल्याबाई साहेबाचे उदरींच महाराजास दुसरी कन्या जन्मली. त्यांस राजकुमार बाईसाहेब ह्मणून नांव ठेविले. शरभोजी महाराजाचे राज्यभारींत बाज ह्मणावयाचें येक पांखरूं फार अपूर्व कधीहीं या देशीं आले नव्हते. तैसें पांखरू बाज ह्मणावयाचे आले होते. तदनंतरें महाराजास धर्मपत्नी ऐशे सौभाग्यवती मातोश्री अहल्या बाईसाहेब यांचे उदरीं पेसजी दोघी कन्या जन्मल्या. त्यांचे उदरीं महाराजास तिसरी कन्या

जन्मले. त्यांचे नांव बायमा बाईसाहेब ह्मणून ठेविले. अतां शरफोजी महाराज सर्वदा शिवपुराण ऐकणें व शिवपूजा करून यात्रादिकहीं करीत सन्मर्गातच आहेत. सकल जनासहीं सकल राज्यासहीं वैषम्य तिरस्कार यादोहींचा परित्याग करून त्या त्या मताचे मताप्रमाणें, वेदाप्रमाणें चालवीत व सकल जनासहीं व्यसन न येतां युक्तप्रकारें प्रतिपालन करिताहेत. श्रीमद्भोंसलवंशांत महादंपती श्रेष्ठ श्रीमच्छंकर प्रसाद जनित प्रताप स्वीकृत दिल्लीशानुर्भाग स्वातंत्र्य विपक्षीकृत दिल्लीराज सार्वभौम अवनीशकुलललामायमान महाराष्ट्र तथा चोळदेशाधिप पुण्यश्लोक राजाचे चरित्र सकल मनोभीष्ट दायक असें प्रथमवर्ण महाराष्ट्र जाती भगवंत रायाचे पौत्र विठ्ठल रायांचे पुत्र प्रस्तुत चोळदेशाधिपती श्रीमंत राजेश्री महाराज क्षत्रपती शरफोजीराजे साहेब यांचे निज सेवक चिटनीस बाबुराय काश्यपगोत्र आश्वलायन सूत्र ऋक् शाखाध्याई याकडून लिहिजेले ते शालीवाहन शकें १७२५ रुधिरोद्गारि संवत्सर मार्गशीर्षवद्य अमावास्या भौमवासरीं इंग्रेजी सन् १८०३ इसवी डिसंबर १३ तारिखेस लेखन शीमा समाप्त ॥

॥ श्री ॥

# तंजावर वेट्टियान् काणीयाची

श्रीगणेशायनमः ॥ स्वस्ति श्रीमान्महामंडलेश्वर राजाधिराज राजगंभीर भोंसलवंश कुलशिखामणी महाराजराजेश्री प्रतापसिंह महाराज साहेब यांचे गर्भशिरोमणि ऐसे महाराजराजेश्री तुळजामहाराज साहेब यांचे पुत्र भव्य-शीलसिखामणि ऐसे महाराजराजेश्री शरफोजीमहाराज साहेब यानी श्रीरामा-वतारहोऊन चोळनीतीसहीं अधीक नीतीकरून राज्यपरिपालन करित असतां, वटीयान् कल्वटी वगैरे यानी हुजूर यादी देऊन ते यादी हुजुरूनन्यांय निसी माहालास पाठवून परामर्ष करिणे ह्मणून आज्ञा होऊन यादी भाल्याठायीं कल्वटीनें लिहून दिल्या यादींत लिहिले होतें जें पूर्वापूर्वीपासून तंजनगर वट्टियकाणियाची आपली ह्मणून तरी ऐसीं वर्षा अगोदरीं सैंदाचे कारभारीं मवे माहार तंज्यान् कोडियान् सिन्नान यानी कोटची वटियेकाणी बांधूनघेतले ह्मणूनहीं व पूर्वेकडील पेटची वटीयेकाणियाची आपला पंगाळी परमान याची काणियाचींत थोडी बांधून घेतले ह्मणूनहीं, आतां न्यायता बाहूनघेऊन घावें ह्मणून लिहून दिल्हा. त्यांत पेरमानानेहीं हस्ताक्षीं घातला त्यास वठियान् तंजान् व कोठियान् व सिन्नान् यांस बलाऊन विचारिल्यास त्यानी लिहून दिले ते पूर्वापूर्वी पासून तंजनगर वठिमेकाणियाची आपली ह्मणून व सत्तर ऐंशी वर्षांस अगोदरी कल्वटीने तंजावारनगर वटिमे काणियाचि आपलि ह्मणून सिपारसी करून अपहरिला; सर्वेच लटिका होऊनगेला. असची काणियाची अनभोगीत येतां पुनः दोनीदफे कल्वटीने व्यवहार करून लटिका होऊन गेला ह्मणून व आतां आहे. न्यायता परामर्षकरावे ह्मणून लिहून दिल्हे. उभयता वाद्यानी लिहून दिल्यासहीं उभय वादी यानी बलावून आणिल्या साक्षींतहीं व्यवहार निवडनासें कल्वटीने लिहून दिल्हा जे कीं "बृहदीश्वर स्वामीचे देउळाचे सन्निधींत तूप तापून

तापल्या तुपांत तंजन्, कोडियन्, सिन्नान्यांपैकी तंज्यनानें बोट घालून बोट जळनासें गेल्यां वटिमेकाणियाची माझी ह्मणून धरिला व्यवहार हरून गुनेगारी देतों ह्मणून लिहून देऊन शालीवाहन शकाब्द १७२४ कल्यब्द ४९०३ दुंदुभी संवत्सर आडिमास तेदी ८-स श्रीबृहदीश्वर स्वामीचे देऊळाचे सन्निधींत तूप तावून तापिल्या तुपांत तंजनाने वटिमे काणियाची आपली ह्मणून कल्वटीस नाही ह्मणून सांगून बोट घातला. बोट जळालें नाहीं. ते, कल्वटीने ओपूनघेऊन, वठिमे काणियाची माझी ह्मणून धरिलों ते व्याज्य मला गरज नाहीं. तंजन् कोडियान् व सिन्नान यानी अनभोगूंदेत ऐसें असतां वटिमेकाणियाची तंजन् कोडियान व सिन्नान् अनभोगीत यावयाचें अमची ह्मणून मी धरीलोंतें मजवरि गुना ह्मणून लिहून दिल्हा. त्यांत पेरमानानेहीं हस्ताक्षी घातला. उभयवादी यांची यादी व हस्ताक्षी प्रमाणावरून कोठची वटिमे काणियाची कल्वठीस गरजनाहीं ह्मणून व पूर्वेकडील पेठेंत तंजन् कोडियान् सिन्नान आज तागाईत किती अनभोगीत असतातकीं तितुके पेरुमानास गरजनाहीं ह्मणून कोट व पूर्वेकडील पेटेंत तंजन, कोडियान्, सिन्नान् आजतागाईत अनभोगीत आल्या प्रमाणें आचंद्रार्क पुत्र पौत्र पारंपर्य तंज्यान्, कोडियन्, सिन्नान्, यानीच अनभोगीत येणे; पूर्वेकडील पेटेंत तंज्यान्, कोडियन्, सिन्नान्, आजितागाईत अनभोगीताहेत ते जातां बाकीं पेरमानाने आजितागाईत अनभोगीत घेत्याप्रमाणें पेरमानाने अनभोगीत घेणे ह्मणून बारून तंज्यान् कोडियान् सिन्नान् यांस जयपत्रिका देऊन श्रीबृहदीश्वर स्वामीचे देउळाचे शिळेवरी लिहिलें असें.

---

॥ श्री ॥

### बृहतीश्वर स्वामी कारण राजे

# श्री शरफोजी महाराज साहेब यानी

### नग दिल्यास तपसील.

स्वस्ति श्री नृपशालीवाहन शकाब्द १७२० सत्तराशेवीस गतकलिः ४८९९ चारहजार आठशे नव्याणौ इस्तकबील चंद्र १५ मोहरमापासून अर्बामय्यांत नमाहरनव तागाईत श्री बृहदीश्वरस्वामी कारण राजेश्री शरफोजीमहाराज साहेब यानी नग दिल्ह्यास तपसील:—

सनमय्यातन जडीत पदकचंद्र ९ जिलहेजर–रथारूनढहोऊन वाड्याचे माहडीकडे आले असतां दिल्हे हिऱ्याचे पदक येक यासि हिरे देखील मदनाईक २४ पाचीशिरस देखील. २ माणकें; १८ लडकन्मोते ९ जञ्जेरि गोफाची येकेरि सोनेरी नागमोडी प्रमाण १ "। १ ' २ ॥ स नग १ रुप्पेरी नग प्याला साधारण चरकीवजन "१ ' २ ॥। २ ॥। स नगचंद्र २९ शाबन १ अर्घ्य पाद्यासप्याले नकसी यास थइन प्याले २ बसक उभा २ येकून. ४ स नगचद्र २९ शाबानकिताप्याला देखील बसक वजन "२ ।.। ' २ सं १ कित्ता प्यालादेखील बसक वजन "२ ॥। २ १ येकून २ थाबदलचंप्र २६ राजन शंख ऊत्तरफाटोपण रुप्पेरि वरी मीलोमी सोनेरी लडकून मोती १ पोंवलें १ सोनेरी मणी १ १ येकून ३ येकून च्यार वजन रुप्पे "॥। ५। २॥ स १ दरह शंखदेवाबयास बसक गींदी तीवथी प्रमाणे वजन " ३७. ९स येक येकून २ चंद्र २६ जिलकांड गोपूरार्ति पंचखणी वजन ४ ॥। ५॥। १॥ स १ अति येकपात्र कासंड्या रुद जोडील्या कित्ता वजन " ३ ॥। ३ ॥। ॥ ० स नग १ कित्ता वजन " ३ ॥। २ । ० ॥। सनग १ येकून २ श्रीदेवीस कवचास किरीट नकशी १ उरावें कवच माजाखाले

पासून पोट–यापर्यंत वस्त्रदेखील वस्त्राचाहोलकर्णं पल्लयास कानदेखील मकर-
कुंडलें व बुगड्या व चंद्रमुरू येकून नकसी २ हातदरचुडे व कंकण्या
हातसरफणसीत्राले देखील रविराव प्रगाण असे बोटास अंगोठ्या २ प्रमाणें
हात येक प्रमाणें लाहान थोरहात उजवा अभयहस्त, डावा वरदहस्त १
उजवा जपमाळ असें १ डावेस जास्ती कमळमात्र असें १ येकून ४ पांय यास
पांयांचे नग देखील अस्सें पाडघम गुजराती सांखळ्या व तोडे अनवटे, फुलें
पोलारे, विरवद्या जोडवीदेखिल असें पांय २ येकून १२ यासि सोनेरी
मोलामा असे. येकून जिनस १२स कवच पुढील वजन रुप्यें ˊ२॥ ˊ५।
२। स नग· १ येकून ४ येकून ९ येकून १० सन रहिद्द मथ्यांतह रुप्येरी नग
काळंजीयास बसक कमळाप्रमाणे हरडा देखिल वरील घराठरडा देखिल
मलसूत प्रमाणें १ येकून २ स नग वरील घे–यास लडकन पान ३२ रवद्र
पोंवळें १ प्रमाणें पोवळी ३२ येकून हस्तद वजन ˊˊ२॥ ˊ१॥ १।स नग चंद्र
१० रविलोवल १ तबक दौलती प्रमाणें दिल्हें असें. चंद्र ३१ शाबानी
जमाखर्च करविला असें येकून २ स नइस्पत्र पच्यात्तेइन जडीत नग चंद्र
१४ शाबानशिस्फूलयास झहत हिरे मदनायक कमळ १ पलच लहान थोर
१० बारीक ८ येकून १९ माणकें १७३ पाची ३४ घे–यास मोते ४८
येकून नग वजन "।५. '२॥ १ यास १ चांदयासशहत हिरे पुलचे
२३ माणकें ३७ पाची ३ घे–यास मोते ४६ येकून वजन "। १। १। ०॥०
यास नग १ भांग टिळा यास जिनस १३ स पदकें चंद्राकार यास २ हत
मटना येकथोर गिर्दहिरा १ माणकें १४ पाचि १ लडकन मोते ११ येकून
नग १, टिका लांबोळ्या कित्तापाची थोर १ माणिक २ प्रमाणे येककित्ता
दर हिरा १ माणकें २ प्रमाणे ९ यास तपसील कित्ता हिरे १ थोर चौक १
माणकें २ स १ कित्ता दर हिरा १ माणकें २ प्रमाणें ८ येकून ९ येकून १०
स शहत हिरे ९ पाचि १ माणकें २० स १० भासिंग्यास हिरा पलस १
माणके ९. येकून येक.· कित्ता चौफुली यास माणकें ४ स १ येकून १३ स

शहत हिरागद थोर १ चौक ४ लहान बारीक ९ येकून ११ माणकें ४१ पाचे थोर येक लहान १ येकून २ मोते ११ येकून रेशमीदोरेदेखील वोऊन नग १ पानपट्या साजास जडित जिनस टिका दरमाणकें तीनी प्रमाणे ४० पानदर माणीक १ लडकनूतमोती १ प्रमाणे ४० येकून ८० दोवणीस मोते ११६ येकून शहत माणकें १६० मोते १५६ रेशिमी दोरे देखील नग १ नाकचवसरयास माणकें १९ मोते सिरसलडकून देखील ११ यास नग १ कापजोड १ शहत माणकें ४१ प्रमाणें १२ हिरे २९ प्रमाणे १८ पाची कित्ता नगास २५ कित्तानगास २८ येकून ५३ मोते घेऱ्यास ३५ प्रमाणें ५० आंतील कळ्यादेखील जोड १ सनग २ टोपगें बाळ्याजोड १ स शहत माणकें ३२ पाची १६ मोते घोंस १६ पदरं ६६ प्रमाणें मोते २६ स नग २ कापाच्या सांखळ्या कित्ता जोड १ स कित्ता नग १ स टिका ४ गिर्दंदर माणकें ६ पाची १ प्रमाणें २ भासिगादर माणकें ६ येण प्रमाणें २ येकून ४ मोते घोंस वीसास ८० मध्य २३ येकून १०३ सनग १ कित्तास नग सदरह प्रमाणें १ येकून २ यास जोड १ स नग २ कित्ता जोड १ स टिका १६ हिऱ्याचे दरहिरा १ प्रमाणें ८ माणकाची दर माणीक १ प्रमाणें ८ येकून १६ मोते घोंस ३२ सदर पांच प्रमाणें १५० घोस ४ सदर ७ प्रमाणें २८ येकून १८८ येकून २८४ येकून सोनेरी आंकोड प्रमाणें नग २ येकून ४ येकून १३ सोनेरी नग चंद्र १४ शाबान मदनकसी कोडी रुप्पेरी रोसिमि तिप्पदरी प्रमाणें १ राखडी नकशी मथापूल जडित यास माणकें ८ पाचे पदनायक १ पाटी कोंडी रुप्पेरी प्रमाणे नग १ वेणीचा साज यास नाग पांचाफडीचा नकशी यास मोते माथा ५ लडकून ५ शेंड्यासी १ येकून ११ कोंडया सोनेरी प्रमाणे १ ताइत दुहेरी नकसी कोंड्या सोनेरी १ फुले नकसी कुरीवचें वंदरी दरमाणिक येक प्रमाणे माणकें १५ स १५ कहिरी नकसी १ मासोळी नकसी १ चांपे कळी नकसी १ येकून २० लाल रेशिमांत वोऊन समूद नग १ चंद्र २९ जिलहेजी अष्टोत्तर शतलिंग प्रतिष्टेचे दिवसी मंगळसूत्र

देवीस सोनेरी कांबींत वोवून दिल्हे असे. वजन "।०॥१॥ सनम १ येकून ४ रुप्पेरी नग चंद्र २९ रबिलाखर चौकीस टावणीची वजन रुप्पें "७॥।५॥ सणग १ राव नकसीया ३ १ नरीव १ बलक कमळाचादेंट वांकडा येकून पोखार वर मोलामा सोनेरी ५ लडकून तोंडांत पोंवले थोर १ येकून वजन रुप्पें "२०।२ येकून २ चंद्र १४ शाबान कापुरार्तीची तबकडी "॥'१॥।० धूपार्ती "॥०॥०। येकार्ती "।५'१।० पंचार्ती वजन "॥१॥२।० येकून ४ चंद्र ३ वउदकारडा दांडी नकसीस जोडो वसज्यांची नकरींचा नकसी मोलामा सोनेरी प्रमाणे नग १ येकून ७ स भार घांट कांशाची मुंठी वृषभ रुप्पेरी प्रमाणें चंद्र १४ शाबान १ येकून २५ येकून ३७. यास तपसील जडित नग पदक हिऱ्याचे १ शिसफूल १ चांद १ भांग टिळासाच १ पानपट्ट्या साज १ बेसर १ काप जोड १ सनग २. टोपणबळ्या जोड १ सनग २ कापाच्या सांखळया जोड २ स नग येकून नग १४. सोनेरी नग मूद १ राखडी १ वेणीचा साजा—गरसोळी देखील जरी प्रमाणे १ येकून ४ रुप्पेरी नग १८ स तपसील—प्याले तीनीस किता साध.प्याला १. किता नकसी बसक देखील जिनस ४ स २, येकून ३ शंखटोपणाचा मोलामा सोनेरी प्रमाणे १ शंखाची १. कापुरार्ती पंचखणी १ कासड्या २ कवचमोलामा सोनेरी प्रमाणे जिनस १२ स १ काळंजी १ तबक १ ताका १ रावा मोलामा सोनेरी प्रमाणें येक कापुरार्तीची तबक १ चंरार्ती १ येकार्ती १ पंचार्ती कारडा १ येकून १८ सुमार. घांटकांशाची : वृषभ रुप्पेरी. येणेप्रमाणे येकून नग ३७ समाप्त ॥ शुभमस्तु

॥ श्री ॥

स्वस्तिश्री शालीवाहन शकाब्द १७२३ सत्तराशे तेवीस गत कली ४९०२ चारिहजार नौशेदोनि याउपरि चालायाचे दुर्मतिनाम संवत्सर वैशाखमास तारीख ३ शुक्लपक्ष द्वितीया गुरुवार रोहिणी नक्षत्र युक्त शुभदिनी

राजेश्री शरफोजी महाराज कृत श्रीबृहतीश्वरस्वमीचे देउळांत त्रिपणीचे काम चालल्यास तपसील—

गणेशाचे देउळ गर्भग्रह उपाज कोरडा पासून कफोद तागाईत पांढरे घोंड्याचे काम नूतन करून वर स्तूबी तागाईत इटाचे काम करून गच्चाचे विग्रह करून रंग देवून नूतन गणेश करवून कलश ठेऊन कुंभाभिषेक करून अर्धमंडप महा मडप पांढरें घोंड्याचे बांधून इटाचे कोडग ठेऊन वरी इटाची दळवर्शी घालून गच्च करून मंडपांत पांढरे घोंड्यची दळवर्शी १'५० गज घालून गच्च करून पाइऱ्या बांधिल्या असती १.

सुब्रह्मणी स्वामीचे गोपूर कफोद पासून स्तूबी तागाईत दागदोजी करून गच्चाचे विग्रहें करून रंग देऊन नूतन कलश ठेऊन कुंभाभिषेक करून अर्थ मंडप महामंडपावरी इटाची दळवर्शी घालून गच्च करून पुढील मंडपांत पांढरें घोंड्याने ३०० गज दळवर्शी घालून मंडपाचे चारी बांजूच्या भिंती इटाने घालून पाइऱ्या दागदोजी केल्या अस्से ती १.

देवीचे देउळ गर्भ गृहावरी अंतस्त ३ अर्ध मंडप १ महा मंडप १ भैरव मंडप १ समोरील नदीमंडप १ येकून मंडप ७ सात मंडपहीं वरीइटाची दळवर्शी घालून गच्चकरून महामंडपांत सन्निधीस दक्षिण उत्तर दोनी बाजूस कोरडावरी पांढरे घोंड्याची दळवर्शी २०० गज नूतन घातिली अस्सें १.

देवीचे देऊळ अर्धमंडप १ महा मंडप १ येकून दोनी मंडपावरी इटाची दळवर्शी घालून गच्च केला असे १.

सभापतीचा मंडप अर्धमंडप १ महा मंडप १ येकून दोनी मंडपावरी इटाची दळवर्शी घालून गच्च करून मंडपाचे भिंती गच्च करून पांढऱ्या दागदोजी करून मंडपांत २०० गज पांढरे घोंड्याचे दळवर्शी घातली असे १.

दक्षिणामूर्तीचे गोपुरास कफोद पासून स्तूबीतागाईत दाग दोजी करून रंग दिला असें १.

चंडीश्वर स्वामीचे गर्भग्रह कफोद पासून स्तूबी तागाईत दागदोजी करून विग्रह करून रंग देऊन नूतन कलश ठेऊन कुंभाभिषेक करून मंडपावरी इटाची दळवर्शी घालून गच्च केला असें १.

देउळास ईशान्य भागीं त्रिमाळ पत्तीस लागून यागशालेस पांढरे धोंड्याने नूतन बांधिला मंडप अंखण ४ याखेरीज मंडूकतीर्थ जीर्णोत्धार कूपरूप करून नूतन केले असें.

त्रिमांळपत्ती ईशान्यभागीं अंखणें २६ नैऋत्य भागी अंखणें २४ येकून पन्नास अंखणें पांढरे धोंड्याचे काम नूतन करून वरकड त्रिमाळपत्ती येकंदर जद्द जाहल्याठायीं पाकल घालून इटाची दळवर्शी घालून गच्च करून मंडपास उत्तरेकडे पश्चिमेकडे दोनी ठांई इटाची दळवर्शी घालून गच्च करून प्राकाराचे च्यारी भिंतीसहीं आंतीलंगी गच्च केला असमे त्रिमाळ पत्तींत नैऋती कोने पासून ईशान्य तागाईत शिवलिंग २४१ देवि १ येकून २४२ ठेऊन कुंभाभिषेक करून प्रतिष्ठा केली असें

मडपळीचे मंडपास व भिर्तीस देखील इटा गालून गच्च केला असें. दक्षिणेकडील प्राकारांत पूर्वेकडील त्रिमाळपत्तीचे कोरडा पासून पश्चिमेकडील त्रिमाळपत्तीच्या कोरडातागाईत बागास नूतन भिंती इटाचे घालून गच्च केल्या बाबत्ती गज २६० अडव्या भिंतीस गज ९० येकून गज ३५० नूतन भिंती घातिली असें. उत्तरे कडील प्राकारांत देवीचे देउळाचे बागास भोंतले इटाची भिंती घालून गच्च केल्या बाबती गज १५० देउळचे च्यारी प्राकारांत नूतन इटाच्या दळवर्शीमध्ये पांढरें धाड्याचा दळवर्शी घातले गज १५७० याखेरीज इटाची दळवर्शी तीनीइटा उंचीने घातिली १८० गज येणे प्रमाणे

दळवशीं घालून चहूंकडिल पाणी खंदकांत जाऊन पडावयाजोगि मोरी बांधिला असें. १

दरवाज्याच्या गोपुरा समोर अष्टकोडीचे खांबास कोरड पांढरे धोंड्याने सव्वा गज उंच तीन गज चौक, नूतन बांधिला असें. १

शुभमस्तु.



Printed at the
Sri Janardana Printing Works Ltd.,
Town High School Road,
Kumbakonam.

உ

ஸ்ரீ:

# தஞ்சாவூர்

## ஸ்ரீ ப்ருஹதீச்வரஸ்வாமி கோயில் கல்வெட்டுகளில் மஹாராஷ்டிர பாஷையிலுள்ள

# போன்ஸ்லே வம்ச சரித்திரம்

(தஞ்சையில் ஆண்ட மஹாராஷ்டிர வம்சம்)

---

ஸ்ரீமத் போன்ஸ்லே வம்சமானது, ஆதி ஸ்ரீமந் நாராயணரிடம், ஸ்ரீ ஸூர்ய நாராயணர், மனு, இக்ஷ்வாகு, முதலியவர்கள் மூலமாய், கிருதயுகம், த்ரேதாயுகம், த்வாபரயுகம், இந்த மூன்று யுகங்களிலும் தோன்றிய புகழுடைய புண்ணிய புருஷர்களான அரசர்களின் பரம்பரையில் உதித்தது.

இவ்வம்சத்தின் மூலபுருஷராகிய சம்பு என்பவர் இக்கலியுகத்தில் சம்புமலைப்பிரதேசத்தில், மஹாராஷ்டிர தேசத்திற்கு அதிபதியாக, வீரம், கொடை முதலிய உயர் குணங்களால் பிரசித்திபெற்று, நீதிமுறைப்படி, ராஜ்ய பரிபாலனம் செய்து வந்தார். ஸ்ரீ சம்பு பர்வதத்தில் எழுந்தருளியிருக்கும் ஸ்ரீ சாம்பசிவப் பெருமானிடம் அன்புபூண்டு அவரது அருளை வேண்டிக் காலந்தவறாது பூஜை முதலிய அனுஷ்டானங்களை நடத்தி வந்தார். ஸ்ரீசாம்பசிவப்பெருமானும் அவரிடம் அருள் கூர்ந்து அவரது கனவில் தோன்றி அவருக்கு நல்ல சந்ததியும் ஐசுவரியம் முதலியவைகளும் உண்டாகுமென வரந்தருளினார். அந்த வரத்தின்படியே சம்புராஜாவின் உதர சமுத்திரத்தில் குணரத்தினக் குவியலெனக் கீர்த்தியுடன் ஏகோஜீ ராஜன் பிறந்தார்.

ஏகோஜிராஜனும் சம்புபர்வத பிரதேசத்தை நேர்மையாக அரசுபுரிந்து வருநாளில் அவருக்குச் சிவபெருமான் அருளால் **சரபராஜன்** என்ற உத்தம புத்திரன் பிறந்தார்.

சரபராஜன் சிவபக்தியில் ஈடுபட்டு எக்காலமும் விபூதி, ருத்ராக்ஷமணிந்து காலந்தவறாது சிவபூஜை செய்துகொண்டு, ராஜ்ய பரிபாலனத்தையும் செய்துவந்தார். அவருக்கு ஸோமாஸ்கந்தமூர்த்தி* கனவில் தோன்றி மந்திரோபதேசம் செய்தார். அந்த மந்திரத்தின் மகிமையால் தக்ஷிணத்திலுள்ள பாதுஷாவானவர் அவரிடம் ப்ரீதியடைந்து 'பிர்தலிபுரம்' என்ற 'விதலரஹீ' பட்டணத்தை அவருக்கு ஜாகீராகக் கொடுத்தார்.

சரபராஜாவுக்கு **மகாசேனன்** என்ற குமாரர் பிறந்தார்.

அவர் 50,000 குதிரைப் படையுடன் ஹம்பீர் பாதுஷாவிற்கு யுத்தத்தில் உதவிசெய்தார். நீதியுடன் தன் ராஜ்யத்தை ஆண்டுவரும் நாளில் அவருக்கு 50 புத்திரர்கள் பிறந்தார்கள். அவர்களுள் மூத்தவராகிய **ஏகசிவராஜா** ராஜ்யத்துக்கு அதிபதியானார்; வம்சாதிபதியாகவும் ஆனார். அவருக்குப் பரமசிவனிடம் உள்ள பக்தியினால் சிவபிரான் பிரசன்னமாகி 'உன் கீர்த்தியும் உன் சந்ததியாரின் கீர்த்தியும் மகாராஜா என்ற பெயருடன் எங்கும் பரவும். அந்தப் பதவிக்குரிய அநேக விருதுகளையும் சம்பாதிப்பீர்கள்' என்று திருவாய் மலர்ந்தருளினார். அவ்விதமே ஏகசிவ மகாராஜா பல அரசர்களை வென்று அநேக விருதுகளைச் சம்பாதித்தார். அவைகளோடு ஹம்பீர் ராஜனும் தனக்கு ஏகசிவ மகாராஜாவின் தந்தையான மஹாசேன ராஜா செய்த உதவிக்காகவும், ஏகசிவ மகாராஜாவே கீர்த்திவாய்ந்த பல வீரச்செயல்களைச் செய்து தானாகவே ஒரு சேனையைச் சேர்த்து வைத்திருப்பதை முன்னிட்டும், மேலும் ஏகசிவமகாராஜாவுக்கு சிவபிரானே விருதுகளை அனுக்ர

*ஸோமாஸ்கந்தமூர்த்தி—பார்வதி தேவியும், குமாரக்கடவுளும் பக்கத்தில் வீற்றிருக்க எழுந்தருளியிருக்கும் சிவபிரான்.

கித்திருப்பதினுலும், ஏகசிவ மகாராஜாவுக்கு தன் யானை, குதிரை, முதலிய விருதுகளில் சிலவற்றை வழங்கினர்.

இவ்விருதுகள் எல்லாவற்றையும் சேர்த்து அவைகளைத் தம்மிடம் வேலையில் அமர்ந்தவர்களில் சிறந்து விளங்கியவர்களிடம் ஒப்புவித்த விபரம் பின்வருமாறு:—

முக்கிய மந்திரியாகிய பேஷ்வாவையும், முதல் சேனைத் தலைவரும், 'ஸர்நோபத்' என்ற பட்டம்பெற்றவருமான, தேவக ராஜனுடைய வம்சத்தாரையும், இரண்டாவது சேனைத்தலைவரான போவார் வம்சத்தைச் சேர்ந்தவரையும், ஆக இம்மூவரையும் விருதுகளைப் பாதுகாக்கும் வேலையில் அமர்த்தினர். குதிரைகளுக்கும் யானைகளுக்கும் விருதுகளைக் கட்டும்போது, போவார் என்பவர் அந்த விருதுகளை எடுத்துப் பேஷ்வா கையில் கொடுக்க, பேஷ்வா தேவகரிடம் கொடுத்துக் கட்டச் செய்யவேண்டும். இதேமாதிரியாக மற்ற விருதுகளுக்கும் அவைகளுக்கென்று சிலவம்சத்தார்கள் ஏற்படுத்தப்பட்டார்கள். அந்த வம்சத்தார்கள் இன்றும் அதே வேலையைச்செய்து வருகிறார்கள்.

முக்கியமான ஆயுதங்களை தேவகரே சுத்தம்செய்து அரசரிடம் கொடுப்பார். ஆயுதங்களுக்குப் பூஜை செய்யும்போது, வலது பக்கத்தில் போவாரும், இடது பக்கத்தில் தேவகரும், மத்தியில் அரசர் பேஷ்வாவோடும், உட்கார்ந்து பூஜை செய்வார்கள்.

மஹாராஜா சிம்மாசனத்தில் தர்பாரில் வீற்றிருக்கும் சமயத்தில், வலப் பக்கத்திலும் இடப் பக்கத்திலும், முறையே போவாரும் தேவகரும், எதிரில் பேஷ்வாவும் உட்காருவார்கள்.

விருதுகளில் பாக்கியுள்ள, யானைமேல்வைத்து முழங்கும் டமாரமும், யானையின்பேரில் ஏற்றியிருக்கும் பொற்பந்துகளுக்கிடையில் இலங்கும் பொன்மீனும், மற்ற ஆடம்பரமான எடுபிடிகளும் பக்கத்திலும் பின்பக்கத்திலும் வரவேண்டியது.

தமக்குக் கிடைத்த இந்த விருதுகளைத்தவிர தம்மனதுக்குப்பிடித்த சில விருதுகளைத் தாமே ஏற்படுத்திக்கொண்டார்.

மகாராஷ்டிர தேசத்துக்கும் மகாராஷ்டிர ஜாதிக்கும் முக்கியமான வாகனம் பல்லக்காகையால் அப்பல்லக்குக்கு அலங்காரம் செய்யப்படும் சில விருதுகளை இதனடியில் எழுதுகிறேன்:—

யானைத் தந்தத்தினால் செய்யப்பட்ட பல்லக்கின் பக்கங்களும், வளைவுகளும், ஒரே வெண்ணிறப் பளபளப்புடன் பிரகாசித்தன. பல்லக்கின்மேல் விரிக்கும் பட்டும், பட்டுக்கயிறுகளும் பல்லக்கின் கொம்பில் முன்னும் பின்னும் தங்கத்தினால் அமைந்த யாளி முகமும், புலியின் வாயும், பல்லக்குக்கூண்டின் இரு கோடிகளிலும் கல்லிழைத்த வாழைப்பூப்போன்ற கலசங்களும், நான்கு மூலைகளிலும் கல்லிழைத்த நான்கு குஞ்சங்களும் ஜாலர்களும், இரண்டு பக்கங்களிலும் உள்ள தண்டுகளுக்கு வெள்ளிக்கவசமும், அவற்றிலிருந்து தொங்கும் ஜரிகைக் குஞ்சங்களும், தொங்கட்டான்களும், பல்லக்கை அலங்கரித்தன. பல்லக்குக்கொம்புகளுக்குச் சில முக்யசந்தர்ப்பங்களில் உபயோகிப்பதற்காக நவரத்தினக் கவசமும், தங்கக் கவசமும் அவற்றோடு விலையுயர்ந்த ஜரிகைக் குஞ்சங்களும் இருந்தன. பல்லக்கின் உட்புறத்தில் நிலைக்கண்ணாடியும், திண்டுகளும், வளைந்த கொம்பிலிருந்து தொங்கும் மயில் விசிறிகளும், வெள்ளித்தகடுகள் பதித்த உட்புறமும், அதின்மேல் பரப்பப்பட்ட வெண்மையான புஷ்பங்களும், தட்டுகளும் விளங்கின. கொம்பின் முன்புறத்தில் யாளி முகமும், அதன்மேல் புஷ்ப ஹாரங்களும், கல்லிழைத்த முத்துக் குஞ்சங்களும், கல்லிழைத்த கவசமும், சில சமயங்களில் தங்கக் கவசமும் அழகு செய்தன. இரண்டு பக்கங்களிலுமுள்ள கொம்புகளுக்கு வெல்வெட்டினால் செய்யப்பட்ட உறைகள் உண்டு.

இவ்விருதுகளைத் தவிர முக்கியமான சந்தர்ப்பங்களில் விசேஷ விருதுகளும் இருந்ததாகச் சொல்லப்பட்டிருக்கிறது.

ஏகசிவராஜாவுக்கு **ராமச்சந்திர ராஜா** என்ற குமாரர் பிறந்தார்.

அவர் நீதி தவறாது ராஜ்யம் ஆண்டுவரும் நாளில் அவருக்கு **பீமராஜன்** பிறந்தார்.

பீமராஜனும் தர்ம முறைப்படி அரசாண்டு வரும்போது அவருக்கு **இரண்டாவது ஏகோஜிராஜா** பிறந்தார்.

இந்த ஏகோஜிராஜா தன் பராக்கிரமத்தால் சத்தாரா கோட்டையைப் பிடித்தார். பிறகு பாதுஷாவோடு சண்டை ஏற்படுமென்று அக்கோட்டையிலேயே வசித்துவந்தார்.

ஏகோஜி ராஜனுக்குப் புத்திரனாக **வராஹராஜா** பிறந்தார்.

இவர் மிக்க வீரமும் தர்ம நெறியும் பொருந்தியவர். ஒரு சமயம் 55,000 குதிரைப்படைகளுடன் பாதுஷாவுடன் யுத்தம் செய்து அதில் வென்று, பிரசித்தி அடைந்தார். அவருக்கு **மூன்றாவது ஏகோஜிராஜா** பிறந்தார்.

இந்த ஏகோஜிராஜாவுக்கு **பிரும்மாஜி ராஜா** பிறந்தார்.

பிரும்மாஜி ராஜாவின் தர்மபத்தினி அனஸாபாயி. அவ்விருவருக்கும் **முதல் ஷாஹாஜீ ராஜா** பிறந்தார்.

ஷாஹாஜி ராஜாவின் பட்டமகிஷி உமாபாயி. அவ்விருவருக்கும் **அம்பாஜி ராஜா** பிறந்தார்.

அம்பாஜி ராஜாவின் மனைவி ரேணுகாபாயி. அவர்களுக்குப் **பரசோஜிராஜா** பிறந்தார்.

பரசோஜி ராஜாவின் மனைவி உமாஹாயி. அவர்கள் புத்திரர் **பாவாஜி ராஜா.**

பாவாஜி ராஜாவின் மனைவி ரேகாபாயி. அவர்களுக்கு இரண்டு புத்திரர்கள் பிறந்தார்கள். மூத்தவர் **மாலோஜி ராஜா.** இரண்டாவது **விட்டோஜி ராஜா.**

இரண்டாவது புத்திரரான விட்டோஜி ராஜாவின் பத்தினி ஆஊபாயீஸாஹேப். அவர்களுடைய மூத்தகுமாரி அம்பாபாயீ. அவருக்குப் பிறகு 8-புத்திரர்கள் பிறந்தார்கள். அவர்கள் (1) ஸம்பாஜி ராஜா (2) கேலோஜி ராஜா (3) மாலோஜி ராஜா (4) பரசோஜி ராஜா (5) நாகோஜி ராஜா (6) மானோஜி ராஜா (7) கங்காஜி ராஜா (8) த்ரிம்பக்ஜி ராஜா என்ற பெயருடையவர்கள். இவ்விதமாக பாவாஜி ராஜாவின் இரண்டாவது குமாரரான விட்டோஜி ராஜாவின் வம்சம் விருத்தியாயிற்று. அதன் விபரம் பிறகு சொல்லப்படும்.

இப்போது பாவாஜி ராஜாவின் மூத்த புதல்வரான மாலோஜி ராஜாவின் கீர்த்தியைப்பற்றி விவரிக்கப்படுகிறது. மாலோஜி ராஜா உமாபாயீ ஸாஹேபைப் பாணிக்கிரகணம் செய்துகொண்டார். அவர் நீதியாக அரசுசெலுத்தி வந்தார். அப்போது தேவகிரிக்கோட்டையில் நிஜாம் பாதுஷா என்பவர் ஆண்டுவந்தார். விஜயதுர்க்கம் என்கிற விஜயபுரக்கோட்டையில் இப்ராஹீம் பாதுஷாவின் குமாரரான எதல்ஷா என்பவர் ஆண்டார். இவர் அல்லீஷா என்ற மற்றொரு பெயரால் பிரக்யாதியடைந்தார். தற்செயலாய் தேவகிரிக்கோட்டை நிஜாம்ஷாவுக்கும் விஜயதுர்க்கத்தின் அரசரான எதல்ஷாவுக்கும் யுத்தம் உண்டாயிற்று. அப்போது பாவாஜி ராஜாவின் புத்திரரான மாலோஜி ராஜா நல்ல சூரராகவும் பல யுத்தங்களில் ஜெயம் பெற்றவராகவும் இருந்தபடியால் அவரையும் அவருடைய சகோதரரான விட்டோஜி ராஜாவையும் தேவகிரிக்கோட்டை நிஜாம் பாதுஷா உதவிக்கு அழைத்தார். இரு சகோதரர்களும் சைனியங்களுடன் நிஜாம் பாதுஷாவுக்கு சகாயமாய் இருந்து யுத்தம்செய்து, விஜயதுர்க்கத்தின் (பீஜப்பூர்) அரசரான அல்லீஷாவை ஜயித்து, தேவகிரிகோட்டையையும் ராஜ்யத்தையும் காப்பாற்றிக்கொடுத்தார்கள். தேவகிரி அரசரும் சந்தோஷமடைந்து தன் ராஜ்யத்தில் நாலில் ஒரு பாகத்தை (சௌத்) இவர்களுக்கு ஜாகீராகக் கொடுத்து, இவர்களைத் தன்னிடமே இருக்கும்படி வேண்டிக்கொண்டார். அதற்கிணங்கி மாலோஜி ராஜாவும் தன்

ராஜ்யத்தை மந்திரியிடம் ஒப்புவித்துவிட்டுத் தன் சகோதரருடன் தேவகிரியிலேயே வசித்துவந்தார்.

அப்போது மாலோஜி ராஜாவுக்கு ஷாஷரீப் பே அல்லி கலந்தர் என்ற ஒரு சித்த புருஷரான சந்யாசியின் சிநேகம் கிடைத்தது. அவரிடம் சென்று மாலோஜி ராஜா தனக்குப் புத்திரபாக்யம் இல்லை என்பதைத் தெரிவித்துக்கொண்டார். அந்த சந்யாசி சற்றுநேரம் தியானம்செய்து மாலோஜி ராஜாவைப் பார்த்து, "உமக்கு இரண்டு புத்திரர்கள் பிறக்கப்போகிறார்கள். அவர்கள் இருவருக்கும் என்னுடைய பெயரை வைப்பாயாக. அவ்விருவரும் பெரிய வீரர்களாகவும் பாக்யவான்களாகவும் விளங்குவார்கள். அவர்கள் வம்ச பரம்பரையும் விருத்தியாகும். நாம் இப்போது உமக்கு ஐந்து வஸ்துக்கள் கொடுக்கப்போகிறோம். அவற்றை நீர் பெற்றுக்கொண்டு மிக்க மரியாதையுடன் காப்பாற்றவேண்டும்" என்று சொல்லி அவரிடம் ஐந்து வஸ்துக்களைக் கொடுத்தார். அவைகளின் விவரமாவது:—

(1) 'நாகின்' என்று சொல்லப்பட்ட பட்டாக்கத்தி ஒன்று (2) 'பத்மின்' என்ற மற்றொரு பட்டாக்கத்தி (3) அவருடைய லங்கோடு ஒன்று (4) பட்டினாலும் பஞ்சினாலும் செய்யப்பட்ட உடை ஒன்று. (5) பஞ்சா* ஒன்று.

இந்தவிதமாக ஷாஹாஷரீப் என்ற சித்த புருஷர் அனுக்கிரகித்தபடி மாலோஜிராஜாவுக்கு சாலிவாகன சகம் 1531(1609),

*பஞ்சா: இது 5 விரல்களையும் மேலே நீட்டிக்கொண்டிருக்கும் ஒரு கையின் உருவம். இது முகம்மதியர்களால் போற்றப்படும் 5 பேர்களைக் குறிக்கும் (அதாவது அல்லா, முகம்மது, அலி, பாத்மா, ஹஸன் ஹுசேன் என்பவர்களைக் குறிக்கும் என்றும், அல்லது பெரியபலசாலியாகக் கொண்டாடப்பட்ட அலி என்பவருடைய கையைக் குறிக்கும் என்றும் சொல்லுகிறார்கள். 'பஞ்சா' என்ற ஒரு கைக்கவசம் இரும்பினால் செய்யப்பட்டு கோஸாவிகள் இடம் இருந்து வந்ததாகவும் சொல்லப்பட்டிருக்கிறது.

சாதாரண வருடத்தில் மூத்த பிள்ளையும், பிறகு இரண்டாவது பிள்ளையும் பிறந்தார்கள்.

மூத்த புதல்வனுக்கு **ஷாஹாஜீ** என்றும், இரண்டாவது மகனுக்கு **ஸரபோஜீ** என்றும் பெயரிட்டனர். ஷாஹாஜிராஜா ஐந்துவயதாக இருக்கும்போது கோல்ஹாபுரத்து அரசருக்கும் நிஜாம்ஷாவுக்கும் மனவருத்தம் ஏற்பட்டுச் சண்டை மூண்டது. அந்தச் சண்டையில் மாலோஜி ராஜா நிஜாம் பாதுஷாவின் பக்கத்தில், தன் சேனையோடும் பாதுஷாவின் சேனையோடும் போய், கோல்ஹாபுர அரசருக்கு எதிராக ஆச்சரியமான வீரத்தோடு போர் புரிந்து, அவர்களைத் தோற்கடித்துவிட்டு, யுத்த களத்திலேயே வீரசுவர்க்கம் அடைந்தார்.

உடனே நிஜாம்பாதுஷா சிறுவர்களாக இருந்த ஷாஹாஜி ராஜா, சரபோஜி ராஜா இருவரையும் சம்ரக்ஷணை செய்யும் பொருட்டு அவர்களுடைய சிறிய தகப்பனாரான விட்டோஜி ராஜாவிடம் ஒப்புவித்து அவர்களுடைய யோக்கியதைக்குத் தக்கவாறு அவர்களைப் பரிபாலித்து வரும்படி ஏற்பாடு செய்தார். பிறகு ஷாஹாஜீ ராஜா யௌவனதசையடைந்ததும், மோஹதே ராஜா என்பவருடைய கன்னிகையான உமாபாயீ சாகிபாவை முதன்முதலாக விவாகம் செய்துகொண்டார். பிறகு நிஜாம்ஷா அனுமதியின்பேரில் தன்னுடைய ராஜ்பத்தில் சாலிவாஹனசகம் 1543, துர்மதி வருஷத்தில் பட்டத்தை அடைந்தார். பிறகு யாதவராஜா என்கிற அரசர், பிரார்த்தனை செய்து தன்னுடைய கன்னிகையான ஜிஜாவூவை ஷாஹஜீ ராஜாவுக்கு இரண்டாவது மனைவியாக விவாகம் செய்துகொடுத்தார். ஷாஹஜி ராஜாவின் இளைய சகோதரரான சரபோஜி ராஜா விசுவாஸராயர் என்பவரின் கன்னிகையான துர்க்காபாயியை விவாகம் செய்துகொண்டார். பிறகு சிலகாலம் சென்றபின் விட்டோஜி ராஜா தெய்வகதியடைந்தார். அவருடைய 8 பிள்ளைகளும் நிஜாம் பாதுஷாவை அனுசரித்து இருந்தனர்.

பிறகு ஒரு விசேஷ தினத்தன்று நிஜாம் பாதுஷாவானவர் தனக்கு அடங்கிய அரசர்கள் எல்லோரையும் வரவழைத்து ஒரு தர்பார் நடத்தினர். அந்த தர்பாருக்கு முக்கியமாக வந்தவர்கள், மாலோஜி ராஜாவின் குமாரர்களான ஷாஹஜி ராஜா, சரபோஜிராஜா என்ற இருசகோதரர்களும், அவர்கள்சிற்றப்பன் விட்டோஜி ராஜாவின் எட்டு குமாரர்களும், ஷாஹஜி ராஜாவின் இரண்டாவது மனைவியின் தந்தையான யாதவ ராஜாவும், அவருடைய குமாரரான தத்தாஜி ராஜாவும், கண்டாகலே என்பவரும், மற்றும் அநேக பெரிய பிரபுக்களும் வந்திருந்தார்கள். தர்பார் இனிதே முடிந்தவுடன் எல்லோரும் வெளியே வரும்பொழுது கூட்டம் அதிகமாய் இருக்க, அக் கூட்டத்தில் கண்டாகலே என்றபிரபுவின் யானை மதங்கொண்டு அநேக ஜனங்களைக் கொன்று வீழ்த்தியது. அப்பொழுது யாதவ ராஜரின் மகனாகிய தத்தாஜி ராஜா என்பவர் கத்தியை எடுத்துக்கொண்டு கண்டாகலே என்பவருடைய யானையைக் குத்துவதற்குச் சென்றார். அந்த சமயத்தில் விட்டோஜி ராஜாவின் புத்திரர்களான எட்டுப்பேர்களில் சம்பாஜிராஜா, கேலோஜி ராஜா ஆகிய இருவரும் கண்டாகலே என்பவரிடத்தில் உள்ள சிநேகத்தினால், அந்தக் கண்டாகலேயின் யானையைக் கொல்ல வந்த தத்தாஜி ராஜாவை அவ்விதம் செய்யக்கூடாது என்று தடுத்தனர். அப்பொழுது தத்தாஜி ராஜா கோபங்கொண்டு, அநேக ஜனங்களைக் கொன்ற யானையைக் கொல்லவந்தபொழுது நீ எதற்காகத் தடுக்கவேண்டும் என்று, ஒருவர்க்கொருவர் விவாதம் ஏற்பட்டுச் சண்டை யுண்டாயிற்று. அச்சண்டையில் விட்டோஜி ராஜாவின் புத்திரரான சம்பாஜி ராஜாவின் கத்திக்கு, தத்தாஜி ரராஜாவின் தலை இரையாயிற்று. அப்பொழுது தத்தாஜி ராஜாவின் தந்தையான யாதவ ராஜா சமீபத்தில் இல்லை. அவருக்குத் தன்னுடைய மகனான தத்தாதி ராஜன், கண்டாகலேயின் யானையின் பொருட்டாக ஏற்பட்ட விவாதத்தில் விட்டோஜி ராஜாவின் மகனான சம்பாஜி ராஜாவால் தெய்வகதி அடைந்தார், என்ற செய்தி தெரிந்ததும், சம்பாஜி ராஜா,

கேலோஜி ராஜா இருவர்களுடன் யுத்தத்திற்கு வந்தார். அப்பொழுது, யாதவ ராஜா தன்னுடைய மாமனாராக இருந்த போதிலும், ஷாஹஜி ராஜா, தன் சிற்றப்பனின் புத்திரர்களான சம்பாஜி ராஜா, கேலோஜி ராஜா இவ்விருவர்களுடன் சேர்ந்து தானும் அவருக்கு எதிராக யுத்தம் செய்தார். அப்பொழுது மாமனாரான யாதவ ராஜாவினால் அடிபட்டு ஷாஹஜி ராஜா மூர்ச்சையடைந்தார். யாதவ ராஜா அவரைக் கொல்லாமல், அவருடைய சைனியத்துடன் யுத்தஞ்செய்தார். அந்த யுத்தத்தில் விட்டோஜி ராஜாவின் மகன் சம்பாஜி ராஜா, யாதவ ராஜா இருந்த இடத்தைவிட்டு யுத்தகளத்திற்கு வந்தார். உடனே ஷாஹஜி ராஜாவும் மூர்ச்சை தெளிந்து யுத்தஞ் செய்யுஞ் சமயத்தில், நிஜாம்பாதுஷா எல்லா விஷயங்களையும் கேள்வியுற்று யாதவ ராஜாவுக்குப் புத்திரசோகம் உண்டானதினால் அதிக வீராவேசம் இருக்குமாதலால், இச்சமயத்தில் யுத்தம் செய்யக் கூடாது என்று சொல்லி, யுத்தத்தை நிறுத்தி, அவரவர்களை அவரவர்களுடைய இடத்திற்குப் போகும்படி கட்டளையிட்டார். யாதவ ராஜாவும் தன் இருப்பிடத்தை அடைந்து மனச் சோர்வுடனிருந்தார்.

இம்மாதிரி யாதவ ராஜா மனக்கலக்கமடைந்திருப்பதையும் அதன் காரணத்தையும் விஜயதுர்க்கத்தை ஆண்டுவந்த அல்லியதில்ஷா அறிந்ததும் கீழ்க்கண்டவாறு யோசனை செய்தார்:—

"தேவகிரி கோட்டை நிஜாம் பாதுஷாவிற்கும் நமக்கும் ஒன்றிரண்டு தடவை யுத்தம் நடந்தபோது சேனையுடன் நாம் தோல்வியுற்றோம். அதற்கு முக்கிய காரணம் ஷாஹஜி ராஜா, யாதவ ராஜா முதலான அநேக சூரர்கள் நிஜாம் பாதுஷாவுடன் சேர்ந்ததேயாகும். தற்சமயம் அவர்களில், மகா சூரரான யாதவ ராஜா மனக்கலக்கமுள்ளவராய் இருப்பதால், நாம் அவருடன் பேச்சு வார்த்தை நடத்தி, அவரை நம் வசப் படுத்திக்கொண்டு, நிஜாம் பாதுஷாவுடன் யுத்தம் நடத்தி வெற்றியடைய வேண்டும்," என்று தீர்மானித்துக்கொண்டு,

